सत्कार्योत्तेजक सभा - धुळें

[ श्री रामदास आणि रामदासी मासिक पुस्तकांत प्रसिद्ध झालेला ]

श्री

# रामदास आणि रामदासी

भाग छत्तिसावा

सर चौथा ]  [ माणि तिसरा

# श्रीरामदासीचीं ऐतिहासिक कागदपत्रें

( २ )

## नरसीपुर - सावंत



तरुण पिढी तेजस्वी निपजण्यास जुन्या कागदपत्रांच्या साहाय्यानें लिहिलेल्या खऱ्या इतिहासाचा फार उपयोग होतो.

— लोकमान्य







१८६१ नागपंचमी



किंमत-दोन रुपये

प्रकाशक—शंकर श्रीकृष्ण देव, चिटणीस, सत्कार्योत्तेजक सभा, धुळें

मुद्रक—विश्वनाथ गणेश जावडेकर, आत्माराम छापखाना, धुळें

श्री

रामदासीचीं ऐतिहासिक कागदपत्रें

( १ ) कारी व आंबवडे-जेधे देशमुख

( २ ) नरसिंहपुर - सावंत

॥ श्रीरामसमर्थ ॥

# श्रीरामदासींचीं ऐतिहासिक कागदपत्रें

## ( २ )

## नरसीपुर – सावंत

## प्रस्तावना

**कोणत्या हि उदयोन्मुख राष्ट्राला आपल्या इतिहासाचें संशोधन करणें हें पाहिलें काम असतें.** — लोकमान्य

सातारा जिल्ह्यांतील वाळवे तालुक्यांत नरसिंहपुर म्हणून कृष्णेच्या कांठीं एक लहानसें, प्राचीन, रम्य आणि निवांत स्थान आहे. तो सबंध गांव ब्राह्मणांना अग्रहार आहे. तेथील वतनदार पाटील रा. रा. नाथाजी लक्ष्मण ऊर्फ नानासाहेब सावंत यांनीं आपल्याजवळील कागदपत्रें व ताम्रपत्रें, पूर्वीचा परिचय नसतां हि, अति विश्वासानें, आमच्या स्वाधीन केलीं होतीं. आम्ही त्या पत्रांच्या नकला करून घेऊन मूळ पत्रें त्यांच्याकडे परत पाठविलीं. या गोष्टीस आज पांच सहा वर्षें झालीं. तीं पत्रें प्रकाशित होण्याचा योग मात्र या वर्षीं आला.

हल्लीं प्रकाशित असलेल्या व विद्यालयांतून शिकविण्यांत येणाऱ्या बहुतेक इतिहासग्रंथांवरून सामान्य समजूत अशी झालेली आहे कीं, क्रमशः राजांच्या कारकीर्दी व लढायांचीं वर्णनें म्हणजे च इतिहास होय. पण ही समजूत चुकीची आहे, हे उघड आहे. राष्ट्राच्या राजकीय अंगाइतकें च, किंबहुना जास्त च, महत्त्व सामाजिक आणि धार्मिक अंगांचें असतें. राष्ट्राच्या सामाजिक आणि धार्मिक अंगांना अनुसरून च त्याच्या राजकीय अंगाचीं आंदोलनें होत असतात. त्यामुळे ज्या कागदपत्रांच्या योगानें राष्ट्राच्या सामाजिक आणि धार्मिक अंगांची आपणांस कल्पना करतां येईल, ज्यांच्या आधारें लोकांच्या धर्मसमजुती आणि त्यांचे सामाजिक व्यवहार यांचें ज्ञान आपणांस होऊं शकेल, तीं

सारीं कागदपत्रें इतिहासभक्तास राजकीय उलाढालींच्या कागदपत्रांइतपत तरी आदरणीय वाटलीं पाहिजेत. सत्कार्योत्तेजक सभा पूर्वकालीन कोणत्या च कागदपत्रांचा अव्हेर करीत नाहीं, याचें हें मुख्य कारण होय.

दत्तविधानपद्धति, व्यवहारपद्धति, न्यायदानपद्धति, वतनांचें स्वरूप आणि महत्व, मजालसींची रचना आणि कार्य, गांवगाडा आणि त्यांत हि महारांचें स्थान, महारांच्या इमानीपणाविषयीं तत्कालीनांना वाटणारा विश्वास, इत्यादि अनेक विषयांसंबंधीं माहिती होण्याला प्रस्तुतच्या भागांतील कागदपत्रांचें साहाय्य होणार आहे. या दृष्टीने या भागांतील कागदपत्रांचें महत्व आहे. गांवोगांवच्या तत्कालीन अधिकाऱ्यांचीं नांवें कळणें सुद्धां उपयुक्त असतें. त्यायोगें जास्त संशोधन करण्याचीं ठिकाणें कळतात. श्रीरामदासी संप्रदायापुरतें पाहिलें तरी भानजी गोपाळ, रुद्राजी चंदो इत्यादिकांचीं नांवें ज्या कागदपत्रांत आढळतील ती कागदपत्रें बाजूस सारणें रामदासी मासिकास तरी शक्य नाहीं.

श्रीरामदासी मासिकाकडून पूर्वी **कारी** व **आंबवडें** येथील **जेधे देशमुख** यांच्या ऐतिहासिक कागदपत्रांचा पहिला भाग प्रसिद्ध झाला व प्रस्तुतचें **सावंतांचें** दुसरें घराणे प्रसिद्ध होत आहे. यापुढें **चोल** येथील **अधिकारी** यांच्याकडील शिवपूर्वोत्तरकालीन कागदपत्रें प्रकाशित करण्याचा आमचा विचार आहे. चालू वर्षांत च त्यांच्या प्रकाशनाला सुरुवात होईल.

या दोन घराण्यांप्रमाणें आपल्या महाराष्ट्रांत अनेक ऐतिहासिक घराण्यांत जुनीं कागदपत्रे असलीं पाहिजेत. तीं प्रकाशित करण्याची कामगिरी कोणी हि विश्वासानें सत्कार्योत्तेजक सभेवर सोंपविली, तर त्या त्या घराण्यांची एवढी सेवा करण्यास सभा सिद्ध आहे. तरी महाराष्ट्रांतील सर्व ऐतिहासिक घराण्यांना आमची विनंति कीं, त्यांनीं आपल्या संग्रहीं असणारीं कागदपत्रें आमच्याकडे पाठवावीं, त्यांच्या आम्ही नकला करून घेऊन मूळ कागद ज्यांचे त्यांस परत करूं, किंवा त्यांची इच्छा असल्यास त्या कागदांचे निरंतर संरक्षण व्हावें, म्हणून ते श्रीसमर्थवाग्देवतामंदिरांत ठेवूं.

| धुळें | चिटणीस |
|---|---|
| १८६१ लोकमान्यपुण्यतिथि | सत्कार्योत्तेजक सभा — धुळें |



श्री

# रामदास आणि रामदासी

## भाग छत्तिसावा

# श्रीरामदासीचीं ऐतिहासिक कागदपत्रें

## ( २ )

## नरसीपुर – सावंत

लेखांक १ ]

१६१९ श्रावण शुद्ध ६
१६९७ जुलै ता. १४

[ नक्कल-मोडी

श्री

तालीक

शिका तुळाजी बिन शंकराजी निकम

चिरंजीव राजेश्री संताजी बिन लखमोजी सावंत पा मौजे कोळे पा कराड यासी प्रति तुळजाई कोईम विठोजी सावंत पाटील मौजे नरसीपुर पा शिराळे असीर्वाद सुा सबा मया अलफ कारणे लेहून दिल्हे संतोषपत्र यैसे जे आपला भरतार मेला त्यास पंचवीस तीस वर्षे जाहालीं आपणासी कोणी लेक पुत्र पोसावयासी नाहीं वतनदार यामुळें लोकाचे कर्जवाम घेऊन खादले वतनासी पातेजोन लोकांनीं दिल्हे त्यासी फेडावयासी गांवांमधे धामधूममुळें कांहीं उपाव जाहाला नाहीं ऐसीयासी

देशमुख पा शिराळे

कर्जदारांनीं आपणासी निकड केली कीं आपले कर्ज फरीक करणे नाहीं तरी आपलें वतन लेहून देणे त्यासी तुम्ही आपले गोत्रज तुमचे येऊन गळां पडले कीं तुम्ही गोत्रपुरुष असोन दुसरीयास वतन जाऊं देऊं नये म्हणोन तुम्हासी आडझूड जाहाले कीं आपला वंश बुडाला आहे तुम्ही आपले वंशज आहा माझे कर्ज फेडावयासी हि आरुता आहे माझे वतन हि खायासी हि आरुता आहे तरी तुझा येक लेक मज देणे व देणेदाराचे कर्ज हि फारीक करणे इतुके करसील तरी वतनपाटीलकी तुज देईन म्हणोन तुझे गळां पडलेवरी तुम्ही आपला लेक जोती माझे वोटीयांत घातला व कर्ज कबूल केले रुपये १५० दीडशे व आपला आंगीकार केला हे गोष्टीवरून आपले वतन पाटिलकी वडीलपण नांगर निशाण व पडद राहाटिका व धारसे व हकलाजिमा कुलबाब कुलकानु वतनाचे जे वडील बाब तेवढी तुज दिल्ही आहे माझे वडीलाचे वंशावळी परंपरा नाव चालवावे लेकाचे नांव जोती बिन विठोजी सावंत पा मौजे नरसीपुर येसे वंशपरंपरा नांव चालवावे त्यासी तुम्ही आपणासी आपला पुत्र दिल्हा आहेस येक पुत्र तो पुत्र नव्हे देशकाळवर्तमान शरीर नेश्वर्य तरी तूं च माझा पुत्र तुज तुझे पुत्र जे असतील ते माझे चि पुत्र आहेत त्यांनीं माझे वंशाचे नांव चालवावे आपण आपलें वतन पाटीलकी तुझे पुत्रपौत्रास तुझे परंपरेसी दिल्हे आसे माझें कर्ज तुम्ही फारीक केले माझे वडिलाचे हाडे मोकळी केली मज जितां रोटी मेल्या माती देऊन सार्थक करून माझे आशीर्वादें माझें वतन वंशपरंपरा सुखरूप खाणे यासी कोणी आपले वंश नाहीं आपला भावा शिवाजी बिन हिरोजी सावंत पाटील याचे मूल येक काळ दुषकाळाचे देशांतरे गेले होते म्हणोन ऐकिले होते कदाचित् देशकाळें जिवंत असिला वाचून आला तरी माझे तकसीमीसी बोलावयासी त्यास गरज नाहीं त्यासी काशींत गोहत्याचें पातक असे

गोविंदराम व आपाजी हरी देशपांडे पा शिराळे

त्याखेरीज आपला वंश डांइज गोत्रज कोणी नाहीं हे हक जवारीस व गांवीचे गांवलोकास विदित आहे माझा पुतण्या शिवाजी पा याचा लेक जिवंत नसिला मेला असिला तरी कुल अवघी पाटीलकी माझी तकसीम व त्याची तकसीम सावंताची सारी पाटिलकी वतन तुझे वंशपरंपरेसी दिल्हे असे यासी कोणी हरकत करील त्यासी काशींत गोहत्या केलें समान हें पत्र लेहून दिल्हे सही छ ५ माहे मोहरम

**मौजे बाहे ता वालवे**

जनकोजी बिन नाइकजी
पाटील जाधव
( नांगराचें चित्र )

उदाजी थोरात पाटील
बिन सुभाजी थोरात
पाटील ( नांगराचें चित्र )

तुको रघुनाथ कुळकर्णी

**मौजे नरसीपुर**

कृष्णाजी अनंत कुळकर्णी मौजे मजकूर
शामजी नरसिंह कुळकर्णी मौजे मजकूर
भगवंत जिवाजी कुळकर्णी मौजे मजकूर

**बलुते**

बाबदे भट बिन नरसी भट
व्यंकण भट बिन रघु भट
पांडुरंग भट बिन व्यंकणभट जोतीषी मौजे मजकूर
सुभानजी बिन जिवाजी परीट
केदार नाक माहार मौजे मजकूर
हणगाजी नाह्यावी

शिब नाक मांग

केरुजी चांभार

## का नेरले पा कराड

रायाजी पा व सिदूजी पा ( नांगराचें चित्र )

कावजी पा व कडतोजी पा ( नांगराचें चित्र )

नरसो रुद्र कुळकर्णी मौजे मजकूर

## मौजे कापूसखेड पा मार

जोती पा बिन खंडोजी पा व सुभानजी पा व मुरारजी पा व हणगोजी पा व विठू पा ( नांगराचें चित्र )

राघो आपाजी कुळकर्णी गोविंद हरि मौजे मार

मल्हारजी पा मौजे सुरुल पा मार ( नांगराचें चित्र )

जनकोजी पा मौजे रेटरे पा मजकूर ( नांगराचें चित्र )

यमाजी व जयेताजी पा मौजे वाझंड पा मार ( नांगराचें चित्र )

## मौजे वाटेगांव

तुकोजी बिन नाइकजी चव्हाण ( नांगराचें चित्र )

कृष्णाजी बिन मंताजी नलवडे पा

बहिरो बाळाजी कुळकर्णी मौजे मार

## मौजे प्रा कासेगांव किले पनाला

नाराजी बिन शिवाजी पा यादव ( नांगराचें चित्र )

जनाजी बिन नरसाजी पा यादव ( नांगराचें चित्र )

तुळाजी बिन बाळोजी पा यादव ( नांगराचें चित्र )

माहादाजी भास्कर कुळकर्णी मौजे मार १

प्रल्हाद कानो कुळकर्णी मौजे मजकूर १

कृष्णाजी बिन हरिजी चौगले मौजे मजकूर लटके १

## मौजे सिरटे पा। कराड

धांरोजी बिन नाकाजी पा। मौजे मजकूर ( नांगराचें चित्र )
बी॥ जिवाजी नारायण कुळकर्णी मौजे मजकूर

## मौजे रेटरे बु॥ पा। कराड

माहादाजी बिन धमाजी पा। मोहिते ( नांगराचें चित्र )
कृष्णाजी आपाजी कुळकर्णी मौजे मजकूर

## मौजे गोदी पा। कराड

सर्ज्याराव बिन नरसोजी पा। मौजे मजकूर ( नांगराचें चित्र )
बी॥ मांणकोजी नरसिंह कुळकर्णी मौजे मा।र

## मौजे पा। कराड

१ लखमाजी पा।
१ भिकाजी बिन सिदोजी पा। ( नांगराचें चित्र )
बी॥ माणको नरसिंह कुळकर्णी मौजे

## मौजे शेणोली

फिरंगोजी पाटील बिन जनकोजी, लिंबाजी बिन वाघोजी पा।
( नांगराचें चित्र )
आपाजी नारायण कुळकर्णी मौजे मजकूर

## मौजे बचूत पा। कराड

तुकोजी पा। बिन म्हसोजी पा। मौजे मजकूर ( नांगराचें चित्र )
रामाजी बापोजी कुळकर्णी मौजे मजकूर



लेखांक २ ] १६३४ कार्तिक शुद्ध ५ [ अस्सल-मोडी
१७१२ ऑक्टोबर ता. २२

स्वस्ति श्री नृपशालिवाहन शके १६३४ वर्ष नंदन नाम संवत्सरें कार्तिक शुध पंचमी बुधवासरे पूर्वाषाढा नक्षत्र तदिनी बी हुजूर हाजीर मज्यालस परगणे शिराळें ब तारीख छ ४ माहे सवाल सुहूर सन सन सलास अशर मया अलफ सन हजार अकराशे बावीस ११२२

राजमुद्रा

राजश्री श्रीनिवास परशुराम
पंडित प्रतिनिधि




सुभानजी रुद्रोजी ना॥
कदम नाईकवाडी पा॥
शिराळे

देशक व मोकदम देहाये पा॥ शिराळे

गोविंदराम व अणाजी हरि
देशपांडे पा॥ मजकूर

तुळाजी बिन रावजी
पाटील मौजे सुरळी
( नांगर )

मौजे वाहेगाऊ

तुकोजी पा॥ कृष्णाजी
चव्हाण पा॥ नलवडे

( नांगर )
बीा बहिरो बाळाजी कुळकर्णी
मौजे मजकूर

## मौजे बोरगाऊ

सुभानजी पाटील
वलद नाईकजी पाटील
( नांगर )

त्रिंबक आण्णाजी
कुळकर्णी मौजे
मजकूर

मुरारजी पाटील मौजे
कापुसखडी
( नांगर )

सेटी पाटील वलद तमाजी
पाटील मौजे बाबवडे बुा
( नांगर )

जनकोजी वलद सिदोजी
पाटील नलवडे मौजे
रेटरे झुजारराऊ
( नांगर )

येमाजी पाटील मौजे
वोझरडे
( नांगर )

## मौजे बाहे ताा वाळवे

जनकोजी पाा बिन
नाईकजी पाा जाधव
( नांगर )

येसाजी पाा बिन
सुभानजी थोरात
पाा
( नांगर )

बी।। तुको रघु-
नाथ कुळकर्णी

## मौजे ताबवे काा कासेगाऊ किले पनाला

सिवाजी बिन हिरजी

जनाजी बिन नरसोजी

पा। यादव १
( नांगर )
बाळोजी बिन तुळजोजी
पा। यादव १
( नांगर )

पा। यादव १
( नांगर )
कुळकर्णी
१ माहादाजी भास्कर
१ प्रलाद कानो
वाकणखार ( ? )
कृस्णाजी पा।
गमलवेकर ( ? )

**मौजे नरसीपुर प्रा। मजकूर**

कुळकर्णी मौजे मा।र
१ कृस्णाजी अनंत
१ शामजी नरसीह
१ भगवंत जिवाजी

जोतिषी व बलुते[१]
१ बाबदेभट बिन नरसिंभट
ज्योतिषी मौजे मजकुर
१ वेकटभट बिन चंद्रभट
१ पांडुरंगभट् बिन्न व्यंकटभट्
ज्योतिषी

१ सुभानजी बिन
निमजी परीट
१ दे.रोजी चांभार

१ हणगोजी बिन कोन्होजी नाहावी
१ केदार नाईक बिन
———— ————
१ शिवनाक मांग

यां हुजूर जाहला महजर यैसा जे बा। तुळजाई पाटलीण कौम विठोजी वलद हिरोजी पाटील सांवत मौजे नरसींपुर पा। सिरालें इनें समस्त गोत पा। मजकूर व हकजव्हार यांजपासीं जाहीर केलें जे अपला मर्द विठोजी पाटील मृत्य पावोन चवेदा वरसें जाहालीं आपले पोटीं संतान नाही

( १ ) या तीन सह्या बाळबोधींत निरनिराळ्या अक्षरांत आहेत.
( २ ) मागील लेखांकांत या बाबतींत चूक झालेली दिसते.

आपण निपुत्रिक अगर आपले भाऊबंद गांवी कोण्ही नाहींत वतन बुडत आहे आपण आजीपावतों रांडपण घातलें आपणास अंनवस्त्र घावयास कोणी धणी नाही आणी वतन बुडतें यास तुम्ही देशक पा मार व गोतगंगा आहां आपले वतनास खावंद करून देणें आपलें अंनवस्त्र चालोन वडिलांचें नांव जतन होये यैसें करावें म्हणून विनंति केली त्यावरी समस्त गोतानी तुळजाई पाटलीणीस विचारिलें कीं तुझे दाईज गोत्रज वतनास सेरसे कोण्ही असतील तरी त्यांची खबर तहकीक घेऊन त्याचे येक मूल आपल्या वोंटीयात घेऊन आपलें वतन अनभऊन आसणे त्याजवरून तुळजाई पाटलीणीने जाहीर केलें कीं मौजे कोळें परगणे कऱ्हाड या गांवीचे पाटीलाचें व आपले मूळ येक आहे आपलें घर वठलें तरी त्यानी खावें त्यांचें घर वठलें तर आपण खावें यैसें आपले वडील पूर्वापार बोलत आले आहेत व हमशाई गांव आहेत, त्यांस ही दखल आहे त्यामध्यें संताजी वलद लखमोजी सांवत पाटील मौजे कोळेकर यांचे घर व आपलें घर येके तकसीमेस सरेंसे आहे यैसीयास तुम्ही गोतगंगा आहां संताजी वलद लखमोजी सावंत पाटील कोळेकर याचा लेंक जोत्याजी मूल लाहान पांचा वरसांचा आहे तो आपलीया वोंटीयांत घालून आपणास पुत्रदत करावें तेणेकरून आपलें वतन राहील आणि आपलें कर्जवाम वारावें आपणास जितां रोटी मेल्यां माती देऊन वतन राखावें यास्तव मी आपले आत्मसंतोपें रजावंदीने लेंक घेते हे गोष्टी तुम्ही हातीं धरणे म्हणून गोतामध्यें बहुत बाजीद जाहली गोतानी मनास आणीतां तुळजाई पाटलीणीनें आपला हालहवाल जाहीर केला तो खरा च आहे समस्तांस मानलें संताजी वलद लखमोजी पाटील सावंत कोळेकर याचे व नरसींपुरकराचें घर येक यास वतन सरतें हें जाणोन देशक व समस्त गोत पा मार हकजवार मिळोन संताजी वलद लखमोजी सावंत पाटील कोळेकर याचा लेंक जोत्याजी तुळजाईच्या वोट्यात घातला आहे विठोजी वलद हिरोजी सांवत पाटील याची तकसीम इनाम व हकलाजीमा व पालक व ठीकाण व पटीपासोडी व सेवधार वगैरे कानु बाब व वाडी

वठार व नांगर कारभार होळीची पोळी यैसें तमाम अनभऊन सुखी असावें जोत्याजी वलद विठोजी पाटील सावंत नाव चालऊन तुळजाईचा प्रतिपाळ करून वतन भोगवटा करून सुखरूप आसावें तुळजाई पाटलीणीचें कर्जवाम जे आसेल तें संताजी वलद लखमोजी सांवत पाटील याने वारावें देशकालवर्तमान कदांचित जोत्याजीस बरें वाईट जाहलें तर संताजी वलद लखमोजी पाटील कोळेकर सांवत याचे लेंक जे अस्तील त्यानी सदरहु नरसींपुरचें पटेलगीचें वतन वौशपरंपरेने खावें यास जो कोण्ही ईस्कील करील त्यास श्री　　　वारणसीमध्यें गोहत्येचें ब्रम्ह-हत्येचें पातक असे व श्री नृसिंव्ह देवस्वामी पांढरीचा याची शफत आसे हा महजर सही वळी सुमार ११५ येकशे पध्रा रास

---

लेखांक ३ ]　　१६५० पौष शुद्ध ७<br>१७२८ डिसेंबर ता. २९　　[ अस्सल-मोडी

श्री

स्वस्ति श्री राज्याभिषेक शके ५५ कीलक संवत्सरे पौष्य शुद्ध सप्तमी गुरुवासरे क्षत्रियकुलावतंस श्री राजा शाहु छत्रपति स्वामी







याणी देशमुख व देशपांडे पाा सिराळें प्राा मल-कापुर

यांसी आज्ञा केली ऐसीजे जोत्याजी बिन विठोजी सांवत पाटील मौजे नरसिहपुर पाा मजकूर याणे हुजूर स्वामी सांन्निध येऊन विनंति केली

---

( १ ) हा कागद एक वेटाळें असून मागें प्रत्येक जोडावर " राजते लेखनावधी " असे शिक्के आहेत.

कीं मौजे मजकूरचे पाटीलकीचें वतन विठोजी वलद हिरोजी पाटील सावत यांचे तो मयेत जाला त्याची स्त्री तुळजाई पाटलीण निपुत्रिक तिचें संरक्षण करणार कोणी नाहीं आणि वतनास हि कोणी खावंद नाहीं याकरितां तुळजाई पाा मजकूरचे देशक याजवळ उभी राहोन आपले वर्तमान सांगितलें त्यावरून देशक व समस्त गोतानी तुळजाईस सांगितलें कीं तुझा दाईज गोत्रज वतनास सेर सारिखा असेल तरी त्याचे मूल आपले वोटीस घेऊन वतन अनभऊन राहाणें त्यास तुळजाईनें देशक व गोताजवळ जाहीर केलें कीं मौजे कोळें पाा कऱ्हाड येथील पाटीलाचा आपला मूळपुरुष येक आहे आपले नकल जाले तरी त्याणी वतन खावें त्याचे नकल जालें तरी आपण वतन खावे अैसे आपले वडील पूर्वापर बोलत आले आहेत व हमशाई गावास हि दखल आहे त्यामध्ये संताजी वलद लखमोजी पाटील मौजे कोळें याचें व आपले घर येक तक्षीमेस सेरसें आहे त्याचा लेक जोती लाहान मूल पांचा वर्षांचें आहे तो आपले वोटींत घालून दत्तकपुत्र करून घ्यावा म्हणजे आपलें वतन राहेल कर्ज वारेल म्हणून त्यावरून गोतानी मनास आणून संताजी सावत पाटील कोळेकर याचा लेक आपण आपणास देशकानी व गोतानी हक जवार मेळऊन तुळजाईच्या वोटींत घातले विठोजी बिन हिरोजी सांवत पाटील नरसिहपुर याची तक्षीम इनाम व हकलाजिमा व पालक व टिकाण व पटी पासोडी व सेवधार वगैरे कानुबाब व वाडा वाटार व नागर व कारवार होळीची पोळी ऐसे अनभवावें जोतजी वलद विठोजी पाटील नांव चालवावें तुळजाईचा प्रतिपाळ करावा तुळजाईचे कर्ज वाम जे असेल ते संताजी बिन लखमोजी सांवत याणें वारावें आपणास बरें वाईट तरी संताजीचे लेक जे असतील त्याणी नरसिहपुरचे पाटीलकीचे वतन वंशपरंपरेने खावे ऐसा निर्वाह करून गोतानी महजर करून दिल्हा त्याप्रमाणें आपण वतन अनभवीत आहे हुजूरचीं पत्रें असलीं पाहिजेत याकरितां स्वामीनी कृपाळ होऊन पत्रे द्यावयाची आज्ञा केली पाहिजे म्हणून विनंति केली व महजर आणून दाखविला त्यावरून

मनास आणितां विठोजी सांवत पाटील मौजे मजकूर यास संतान नव्हतें तो मृत्य पावला त्याची स्त्री तुळजाई तिचा प्रतिपाळ करावयास कोणी नाहीं व वतन हि बुडतें मागील कर्जवाम वारलें पाहिजे याकरितां तुळजाईनें संताजी सांवत पाटील कोळेकर यांचे आपलें घर येक ऐसें जाणोन त्याचा लेक जोती तुमच्या व समस्त गोताच्या विद्यमानें आत्मसंतोषें वोटींत घेऊन दत्तपुत्र केला वतन त्याचे स्वाधीन केलें ऐसें कळों आलें त्यावरून जोत्याजी बिन विठोजी सावत पाटील मौजे मजकूर यांवरी स्वामी कृपाळ होऊन अलाहिदा वतनपत्र करून दिल्हें आहे तरी तुम्ही सदरहु प्रमाणें मौजे मजकूरचे पाटीलकीचे वतन जोत्याजी पाटील यास पुत्रपौत्रादि वंशपरंपरेनें चालवणे या पत्राची प्रती लेहून घेऊन हे असल पत्र भोगवटीयास परतोन देणे जाणिजे लेखनालंकार[1]




रुजु सुरु समत सां सां

निवीस सुमंत मंत्री सरकार

बार सुद सुरु सुद बार बार बार बार[2]



**टीप**—अशी ही पाटिलकीचें वतन चालविण्याविषयीं सनद असून, आजपर्यंत पाहण्यांत न आलेली गोष्ट म्हणजे, ही च सनद, थोड्या फार शाब्दिक फरकाने दहा तांब्याच्या पत्र्यांवर कोरलेली आहे. पहिल्या पत्र्यावर मात्र मथळ्याच्या जागीं एक अष्टकोनी शिक्का आहे तो सनदेच्या कागदांत नाहीं. तो शिक्का बरोबर लागला नाहीं.

---

(१) निराळें अक्षर. (२) तीन कागद जोडलेले. जोडावर मागील बाजूस लेखनसीमेचे शिक्के.




असा कांहीं शिक्का आहे.

नंतर सनदेच्या कागदावरील दोन्ही शिक्के दुसऱ्या पत्र्याच्या मथळ्याच्या जागीं आहेत.

सनद मोडी आहे, पत्रे बाळबोधींत आहेत. या दहा पत्र्यांपैकीं मोठ्याचा आकार ७ × ३। इंच आहे.

याशिवाय आकाराने जरा लहान असे सहा ताम्रपत्रे आहेत. त्यावर गांवोगांवच्या पाटील, कुळकर्णी, भट, जोसी, चौगुला, नाईक, इत्यादिकांचीं नांवें कोरलेलीं आहेत. त्यावर नांगराच्या निशाण्या आहेत. असे दिसतें ही सारी मंडळी दत्तविधानाचे वेळा असावी. सनदेतील देशक व गोत, ती ही मंडळी असावी. या पत्र्यांचा आकार ४। × २। इंच आहे. या सहा हि पत्र्यांतील नांवें दुसऱ्या लेखांकांत आहेत. फक्त पांचव्या पत्र्यांतील दोन तीन नांवे नाहीत. कांहीं नांवें पहिल्या लेखांकांत हि आढळतात. तिन्हीं लेखांकांतील नांवे ताडून पाहिल्यास नकला करितांना कांहीं ठिकाणीं चूक झालेली असावी असें स्पष्ट दिसते.

ते पत्रे असे :

## पत्रा १

मौजे बोरगाव — त्रींबक आणाजी
सुभानजी बीन — कुळकर्णी
नायीकजी पाटील ( नांगर )
मुरारजी — ब कल
पाटील बी — म बहा
न सिदोजी — रो बाळा
पाटील मौ — जी कुळ
जे कापुरा — कर्णी
खेड ( नांगर )

## पत्रा २

तुळाजी पाटील बीन रावजी
पाटील मौजे सुरली
( नांगर )

सेटी पाटील वलद तमाजी
पाटील मौजे बाबवडे +
( नांगर )

जनकोजी पाटील बीन सीदोजी
पाल नलवड मौजे रेटरे
( नांगर )

## पत्रा ३

नरसीपुर कृस्णाजी आनत कुळकर्णी मौजे मजकुर व शामजी नरसीह कुळकर्णी व भगवत जीवाजी कुळकर्णी मौजे मजकुर बावदे भट बीन नरसी भट व त्र्येकण भट बीन चद्र भट जोसी मज मजकुर पाडुरग भट बीन वेकण भट जोसी मौजे मजकुर गोवींदराम व आणाजी हारी देसपाडे परगण मजकुर सुभानजी बीन पडोजी परीट हाणगोजी बीन कानाजी न्हवी केरु चाभार

## पत्रा ४

| | |
|---|---|
| बाळोजी पाटी | माहादाजी |
| ल बीन तुळजो | भास्कर |
| जी पाटील यादव | कुळकरनी |
| ( नांगर ) | टाकनखार |
| | क्रस्णाजी |
| | बीन हरजी चौगललटक |

मौजे वाटगाव तुकोजी पागल चव्हण
क्रस्णाजी पाटील नलवड ( नांगर )

### पत्रा ५

परगणे सिराळे नाईकवाडी सुभानजी नायीक बीन उदोजी नायीक कदम माहादाजी शंकर व गोवीद वीटल माहजन परगणे मजकुर संकराजी देसमुख परगणे मजकुर

### पत्रा ६

मौजे तावबें कसबे कासगाव
कील पनाळा

| | |
|---|---|
| सीवाजी पाटील | जनाजी पाटील |
| बीन बीरजी | बीन नरसोजी |
| पाटील यादव | पाटील यादव |
| ( नांगर ) | ( नांगर ) |

येमाजी पाटील मौजे वोझाडे
( नांगर )



लेखांक ४ ] १६५१ वैशाख वद्य ४ १७२९ मे ता. ५ [ अस्सल-मोडी

० श्री ~
राजा शंभू छत्र
पतिचरणि तत्पर
राणोजिसुत विठो
जि चव्हाण हिंम
त बहादर

राजश्री उदाजी चव्हाण हिंमत बहादुर ताहां जोत्याजी बिन विठोजी पाटील मौजे नरसींपर ता। शिराळें स्रा। तीसां आसरीन मया अलफ तं

हुजूर करवीरचे मोकामीं येऊन विदित केलें जे विठोजी बिन हिरोजी पाटील निमे पटेलगी वडीलपण मौजे मजकूर याचे पोटीं संतान नाहीं तो मृत्य पावला त्याची बाईको तुळजाई तीस कोणी नाहीं त्याचें आमचे पुरातन घर येक याकरितां तिनें आपल्या वोटीयांत घेऊन पुत्र म्हणोन समस्त गोतपंचाईताचे विद्यमाने निमे पटेलगी व वडीलपणा आपली तक्षीम दिली समस्त गोतानी माहाजर करून दिल्हा त्या उपरी सातारीयास गेलों त्यानीं दुमालापत्र दिल्हें साहेबीं मेहेरबानी करून पटेलगीचे दुमालपत्र सादर करणार साहेब धनी आहेत म्हणून त्यावरून मनास आणितां व माहाजर व दुमालापत्र मनास आणितां तुळजाई पाटीलीण मौजे मार इनें तुज आपल्या वोट्यांत घेऊन वतन दिल्हें हें खरें पाहून तुज दुमालापत्र सादर केलें असे तरी मौजे मारची पटेलगी निमे वडीलपण नांगर पानमान इनाम हकलाजिमा कानुबाब पूर्वापार चालत आहे तेणेंप्रमाणें आपले लेकराचे लेकरीं वतन अनभवणें तुझे माथा वतन समंधे सेरणी रुपये ५० पनास रुपये ठेविले ते हुजूर पावले जाणीजे ता छ १७ माहे सवाल मोर्तबसूद






लेखांक ५] १६५१ वैशाख वद्य ४ [अस्सल-मोडी
१७२९ मे ता. ५

श्री




राजश्री उदाजी चव्हाण हिमतबहादुर ता मोकदमानी मौजे नरसीपूर ता सिराले सुा तीसा अशरीन मया अलफ विठोजी बिन हिरोजी

१ निराळें अक्षर.

पाटील निमे पटेलगी वडीलपणा मौजे माार याचे पोटीं संतान नाहीं तो निधन पावला त्याची बाईको तुळजाई तीस कोणी नाहीं याकरितां संताजी पाटील कोळेकर याचा पुत्र जोत्याजी पाा यासी आपले वोट्यांत घेतला देशक पाा माार व गोताचे विद्यमाने पुत्र म्हणून आपले तक्षीमेची निमे पटेलगी वडीलपणा नांगर पानमान इनाम हकलाजिमा कानु बाब स्वाधीन केले पंचाइतानी महजर करून दिल्हा व सातारे कडील राजपत्रें दुमाला मिसल दिली साहेबीं मेहेरबानी करून दुमालापत्र सादर करणार साहेब धणी आहेत म्हणून जोत्याजी पाा मौजे मजकूर यानें करवीरचे मोकामीं विदित केलें त्यावरून मनास आणितां व महजर व राजपत्र मनास आणितां तुळजाईनें पटेलगी दिली हें खरें जाणून तुम्हास ताकीदपत्र सादर केले असे जोत्याजी बिन विठोजी पाटील निमे पटेलगी वडीलपणा नांगर पानमान इनामहकलाजिमा कानुबाब पूर्वापार आहेत तेणेप्रमाणें आपले वतन लेकराचे लेकरीं अनभवील जाणिजे छ १७ माहे सवाल मोर्तब सूद[1]




लेखांक ६ ] १६५८ चैत्र वद्य १२ / १७३६ मार्च ता. २८ [ अस्सल-मोडी

स्थलपत्र ब तारीख २५ माहे जिलकाद शके १६५८ नळनाम सवछरे चैत्र वदे द्वादसी त:दिनी स्थळ मौजे वाघेरी प्रा। कराड सु॥ सीत सलासीन मया अलफ सन हजार ११४५ हजीर मज्यालस बी तपशील

---

१ अक्षर निराळें

राजमुद्रा

देशक प्रगणे मजकूर

शाहुजी राजे भोसले देश-मुख प्रांत कऱ्हाड

देशपांडे पा। मजकूर




## मोकदम गावगना

सिवाजी पाटील पवार मौजे बावींडे प्रा कोलापुर

( नांगराचे चित्र )

रामजी जाधव पाटील मौजे वाठार का उदगांव प्रा मिरज

( नांगराचे चित्र )

नागोजी पाटील ई × वले मौजे रिसवड ता उबरज प्रा कराड

( नांगराचें चित्र )

गुलबाजी पा व नाईकजी पाटील पिसाळ मौजे करवंड हवेली प्रा कराड

( नांगराचें चित्र )

सिदोजी पा मौजे अतवंडी प्रा कराड

( नांगराचें चित्र )

मियाजी पाटील मौजे कोर्तान का निबसाड माईणी

( नांगराचें चित्र )

बहिरजी जाधव पां मौजे पाचूद प्रा कराड

( नांगराचें चित्र )

खानाजी पोवार मौजे बाबवड प्रा मिरज

( नांगराचें चित्र )

मलजी सकपाल पाटील मौजे सुरुल प्रा पाटवरं

( नांगराचें चित्र )

फतेखान बलवडखान पाटील मौजे कडेगाऊ का॥ आऊद

( नांगराचे चित्र )

सुभानजी डाग्ये का॥ कराड

मतेखान देसाई मौजे सिरोली प्रा पनाला

( नांगराचें चित्र )

मालोजी कदम व खंडोजी कदम सेटे प्रा खटाव

( नांगराचें चित्र )

सातापा तेली मेतेर का॥ कराड

## स्थलकरी मौजे मजकूर

पवाजी पाटील बिन शामाजी पा मौजे मार

( नांगराचें चित्र )

अर्जोजी पा बिन अबाजी पा मौजे मार

रयाजी मौजे मार

१ जोती माली मेतेर मौजे मार

१ केदार माली मेतर मौजे मार

—
२

### बलुते

१ हणमाजी सुतार

१ डोंगराजी कुंभार

१ माहलोजी परीट

केदारजी पाटील बिन बहीरजी पा मौजे मार

बीलालमे मोरोसी वदड गु॥ कुल-कर्णी मौजे मार वजम मौजे किवले माह्नाड

१ माहदसेटी गाडवा

१ सातपा झाडबुके

१ सहसेटी गुजर

१ अबाजी माली

—
४

१ सटबोजी गुरव
१ सिवाजी चांभार
२ माहर मेतरे
  १ आणा बिन
  नाइका माहार
  १ सोना बिन
  म्हखा माहार
  ---
  २
---
७

या समक्षें जाहाले थलपत्र येसीजे संताजी बिन लखमोजी सावंत पश्चेमवादी पाटील मौजे कोळ प्रा मजकूर याजमधे व सिदोजी बिन हरणे आग्रवादे या उभयेतामधे मौजे मजकूरच्या पटेलकीच भांडणे लागोन हरदोजन वादीये हुजूर गेले हुजूर हरदोजनाचे करीने मनास आणोंन हरदोजनापांसी जमान घेऊन स्थल मौजे मजकूर नेमून हरदोजनवादीयास स्थल मजकूरास पाठविले त्यावरून हरदोजन वादी यानी स्थली येऊन हुजूरची पत्रें आणोन दिली बी तपसील

आज्ञापत्र समस्तसेनाधुरंधर विस्वासनिधी राजमान्ये राजेश्री येसाजी भोसले ताहा मोकदमानी मौजे वाघरी प्रां कराड सुा अर्बा सलासीन मया अलफु संताजी सांवत व सिदोजी हरणे या उभयेतामधें कोलीयाचे पाटलगीच्या वतनाचा वाद आहे यैसीयासी हरदुजनवादीये निवाडियाबदल मौजे मजकूरच थल नेमून देऊन थलास पाठविले आहेत तर हरदुजणाचा इनसाफु बारहाक करून निवाडपत्र करून देणे जाणीजे छ २७ माहे सवाल

सो मोकदमानी मौजे वाघेरी प्रा कऱ्हाड यासी माहादाजी कृष्ण आां देशमुख व देशपांडे व देशचौगुले प्रा मजकूर सुा अर्बा सलासीन मया अलफु संताजी सावंत व सिदोजी हरणे या

उभयेतांत मौजे कोळ येथील पाटलगीचा कजिया आहे त्याबदल हरदुजण तुम्हाकडे पाठविले आहेत तर याचा रास्ती इनसाफु करून निवडोन पाा देणे जाणिजे छ ४ जिलकाद

सदरहुप्रमाणे दिवाणचे व देशक प्राा मजकूर यांचीं पत्रें येऊन हरदुजन वादी ये स्थल मजकूरास येऊन हजीर जाहाले त्यावरून हरदुजणास गोतनाईकी पुरसीस केली की तुम्ही उभयेता आमच्या थलास राजी आसाल तर राजिनामे लेहून देणे म्हणऊन त्यावरून उभयेता वादी यानी आपले आत्मसंतोशे रजावद होऊन राजीनामे लेहून दिल्हे बी तपसील

राजीनामा सिदोजी बिन हरणे आग्रवादी मोकाम मौजे च्वार प्राा मजकूर सुा। अर्बा सलासीन मया अलफु कारणे लेहून दिल्हा राजीनामा येसाजे आपणामधे व संताजी बिन लखमोजी सावंत पश्चिमवादी पाटील मौजे मजकूर याजमधें मौजे मजकूरच्या पटेलगीच्या भांडणे लागोन हरदोजन हुजूर गेलो त्यावरून त्यानी हरदोजनाचे करीने मनास आणून जमान घेऊन उभयेतास स्थल मौजे मजकूर नेमून दिल्हे त्यावरून साहेबी आज्ञा केली की आपल्या स्थलास रजावद असला तर राजीनामा लेहून देणे म्हणोन आज्ञा केली त्यावरून आपण रजावद होऊन आत्मसंतोशे राजीनामा लेहून दिल्हा आसे साहेबा गोतगंगा आहेत जेणेप्रमाण निवाडा करतील त्याप्रमाण आपणं रजावद आहे त्यास नवदिगर करू तर गोताचे आन्याई व दिवाणचे गुन्हेगार हे लेहून दिल्हा राजीनामा सही तेरीख छ ३ जिलकाद

राजीनामा संताजी बिन लखमोजी सावंत पश्चिमवादी पाटील मौजे कोळ प्राा मजकूर सुा। अर्बा सलासीन मया अलफु कारण लेहून दिल्हा राजीनामा येसाजे आपणामधे व सिदोजी हरणे याजमधे मौजे मजकूरच्या पटलगीचे भांडणे लागोन हरदोजन हुजूर

राजेश्री येसाजी भोसले याजकडे व देशक प्रा मजकूर याजकडे गेलो त्यावरून त्यानी उभयताचे करीने मनास आणोन उभयेतापासीं जमानकतबे घेऊन स्थल मौजे मजकूर नेमून दिल्हे त्यावरून साहेबाचे स्थलास आलो त्या वरून साहेबी आज्ञा केली कीं तुम्ही आमचे स्थलास रजावद आसीला तर राजीनामे लेहून देणे म्हणोन आज्ञा केली त्यावरून आपण रजावद होऊन राजीनामा लेहून दिल्हा आसे तुम्ही गोतगंगा जैसा निवाडा कराल त्यास आपण नवदिगर करू तर गोताचे आन्याई दिवाणचे गुणेगार हे लेहून दिल्हा राजीनामा सही तेरीख छ ३ जिलकाद

सदरहु प्रा हरदोजणानीं राजीनामे लेहून दिल्हे त्यावर गोतानी उभयेतास आज्ञा केली की हरदुजण स्थळमजकूरी जमान देणे त्यावरून हरदोजणानी जमान दिल्हे वी तपसील

राजेश्री गोतगंगा स्थल मौजे वाघेरी प्रा कराड गोसावी यासी

मोकदमानीं मौजे पाली ता उबरज प्रां कराड सुा अर्बा सलासीन मया अल्फ कारणे लेहून दिल्हा जमानकतबा येसाजे वी जमानत सिदोजी हरणे आग्रवादी याजमधे व संताजी बिन लखमोजी सावंत पश्चेमवादी पाटील मौजे कोळ या उभयेतामधे मौजे मजकूरचे पटलगीचे भांडणे लागोन हरदोजणवादीये साहेबाच्या स्थलास आले त्यावरून साहेबी हरदोजणास निवाडीयाबदल जमान देणे म्हणोन आज्ञा केली त्यावरून सिदोजी बिन

हरणे यास आपण जमान जाहलो स्थल मजकूरी हजर राहोन कजिया फैसल करून घेतील हजीर राहातील इतके न करिता गैरहजीर जाहाले तर हजीर करून देऊ हजीर

करू न सको तर त्याचे तालुकातीचा जाब करू साधिले आर्थी वर्तऊ तुटले आर्थी निवारा हा लेहून दिल्हा जमानकतबा सही तेरीख छ ९ जिलकाद

निशाण नांगर बी॥ बाळाजी खंडेराऊ
कुळकर्णी मौजे मजकूर

राजेश्री गोतगंगा स्थल मौजे वाघेरी प्रा कराड
गोसावी यासी

जमानकतबा मोकदमानी मौजे प्रां मजकूर सु॥ अर्बा सलासीन मया अलफ कारणे लेहून दिल्हा जमानकतबा येसाजे बी जमानत संताजी बिन लखमोजी सावंत पश्चेमवादी पा मौजे कोळ प्रा मजकूर याजमधे व सिदोजी बिन हरणे याजमधे मौजे मजकूरच्या पाटलगीचे भांडणे लागोन हरदोजन वादीये साहेबाच्या स्थलास आले त्यावरून हरदोजनाच्या निवाडियाबदल उभयेतापासी जमान मागितले त्यावरून संताजी बिन लखमोजी सावंत पा मौजे मजकूर यासी आपण जमान जाहालो हजीर राहून कजिया फैसल करून घेतील हजीर राहातील इतके न करिता गैरहजीर जाहाले तर हजीर करून देऊ हाजीर करू न सको तर त्याचे तालुकातीचा जाब करू साधले आर्थी वर्तऊ तुटले आर्थी निवारा हा लेहून दिल्हा जमानकतबा सही तेरीख ९ जिल्काद

निशाण नांगर बी॥ मलार दामोधर
कुळकर्णी मौजे मजकूर

येणेप्रमाणे उभयेता वादी यानी जमानकतबे आणोन दिल्हे त्यावर गोतनायेकी आज्ञा केली की तुमचे करीने कैसे आहेत ते लेहून देणे त्यावरून हरदोजणानी आपलाले करीने लेहून दिल्हे बी तपसील

तकरीर सिदोजी बिन हरणे मौजे कोळ प्रा। कराड सु॥ आर्बा सलासीन मया अलफु कारणे लेहून दिल्ही तकरीर यैसीजे आपले वडील हरणाशाचे रेयरे मधे होते ते समई मौजे कोळ येथील पाटलकीचे वतन विठोजी पा। सावंत याचे होते ते समई मानाई बडगी इने कोळेची पाटलकी घेतली सावंतास निघेनासी जाहाली मग विठोजी सावंत पा। आपले पणजे बाजी हरणे रेयरेमधे होते त्याजकडे आले आणि त्यास सामील करून कोलीयासी आले विठोजी पाटील व आंबाजी हरणे यानी बाडगीसी वाद सांगितला तीन तीन वर्षें वाद सांगत होती तेव्हा मानाई बडगी इने आपले हरणीयाचे खूण सुमार ४ च्यार केले व सावंताचा खूण येक मेरसोजी सावंत मारला येकून खून पाच जाहाले मग वाद सांगोन रवा काडोन विठोजी पाटील यांनी दिव्ये घेऊन बडगी खोटी केली त्यावर विठोजी सावंत पा। व आबाजी हरणे पाटलगीचे वतन अनभऊन होते त्यावर पुढे काळ पडला त्यामुळे आपले आजे सिदोजी हरणे मोगलाईत गेले त्यावर नाईकजी हरणे व नागोजी हरणे आपले बाप व चुलते वतनावर आले त्यावर राजेश्री भानजी गोपाळ सुभेदार व राजेश्री रुद्राजी चंदो देशपांडिये यासी भेटले वतन आमानत केले होळीची पोळी आमानत करून शिमगी पूर्णमेस गावास आले ते समई बुबाजी सावंत याने कमस्यास तीर लाऊन आपल्या बापावर व चुलत्यावर चालोन घेतले मग नाईकजी हरणे व नागोजी हरणे या दोघा भावानी सुबाजी सावंतास खरडोन काडोन सुताराचे घरांत घातले त्यावर आपले वडीलाचा व सावंताचा वाद जाहाला चे स्थल दिवाणाने नेमून दिल्हे थली वरीसभर वाद सांगितला तेथें निवाडा जाहाला नाही मग दिवाणानी व देसकानी निरोप दिल्हा की तुम्ही गावावर जाऊन कुणबावा करणे गावी राहाणे मग आपण आटकेस येऊ ते समई

तुमचा निवाडा विल्हेस लाऊन देऊ त्यावर गावात येक वर्षी शेते केली घरे बांधली निवाडा जाहाला नाही मग पुढे दुस्काळ पडला त्यामुळे मागती खालतें मोगलाईत मुलूख उठला त्याबरोबर आपले वडील गेले त्यावर गावावर यावयास गाठ पडली नाही हली आपण उभे राहिलो आहो येणेप्रमाणे आपला करीना सेवेसी लेहून दिल्हा आहे तो हमशाई भावाचे मुखे व पांढरीचे मुखे खरे करून देऊ जर करिता हे गोही साक्षीनिसी खरे करुन नेदू तर आपला वाद खोटा आपणास अर्था आर्थी समंध नाही आपण गोताचे आन्याई दिवाणचे गुन्हेगार हे लेहून दिली तकरीर सही तेरीख १५ जिल्काद

तकरीर संताजी बिन लखमोजी सावंत पाटील मौजे कोळ प्रा। कराड सु॥ अर्बा सलासीन मया अलफ कारणे लेहून दिली तकरीर यैसीजे पूर्वापार मौजे मजकूरचे पाटलगीचे वतन आपले आहे आपले मूळ पुरुशाचे पोटी पुत्र सुमार ४ त्यापैकी वडील घर आपले धाकटे घर कान्होजी पाटील याचे त्यास मौजे मजकूरची पाटीलगी करीत असता ईदलशाहाचे कारकीर्दीस तनखेदार रहिमानखान सेख होता तो मोकासा करीत असतां ते समई गावास दोन साल कसाला पडला त्यामुळें दिवाणची बाकी गावावर सेकली कुळ भरणे होते तें हि कसालियामुळे उठोन गेली वसाहत होती तनखेदार मुसलमान हि गावीच नांदत होता त्याने पाटील मजकूरास पैकीयाचा तगादा लाविला त्यामुळे धास्त घेऊन गाव सोडोन वेत गावास कोन्होजी पाटील आले त्यास मागती तनखेदार मोकासी याने येत्न करून इमान प्रमाणे करून गावीचे लावणी-बदल पाटील मजकूरास घेऊन आले ते साली थोडीबहुत

लावणी केली परंतु ते साल हि नापीक जाहाले तनखा भरून पावेनासा जाहाला मग तनखेदार मोकासी यानी कान्होजी पाटलास जेरदस्त करून हणमांर केला आणि तीन सालाचा तनखा भरून देणे म्हणोन तगादा केला त्यास मोकरार तीन सालाचा करार होन ६०० साहासे बेरीज माथा ठेऊन करतबा व्याजसुधा लेहून घेतला त्यावर च्यारपाच वर्शे गावकी केली परंतु पेशजीच्या बाकीचा यैवज व सालमजकूरचा तनखा फिटेनासा जाहाला त्याबदल मागती धास्त घेऊन मौजे वेत-गावास उठोन गेले त्यावर तनखेदार याने दोन च्यार साल गावची लावणी व उगवणी देखील पटलगी केली त्यावर तुपारीकर बडगे हे आपला गाव सोडोन रुसवा करून मुलेमाणसे देखील गाडीयावर घालोन गुरेढोरे घेऊन मौजे मजकूरावरून जात होते तेंव्हा रहिमानखान मोकासी चावडीस बैसला होता त्याने कुणबी कोणे गावावरून जातां म्हणोन बडगे यासी विचारिले त्यानी आपले वर्तमान सांगितले जे आपण तुपारीकर बडगे आहो रुसवा करून जिकडे पोट भरेल तिकडे जात आहो अैसे बोलीयावर रहिमानखान मोकासी बोलिला जे तुमचा भार ठेवणे केलीया आमचे गावी राहाल की काय अैसे विचारिले त्यावर बडगे बोलले जे गला खंडीभर येक व कडबीयाचा बोली येक ध्याल तर तुमचे गावी राहू अैसे बोललियावर मोकासी यानी आगाव घेऊन राहविला गला खंडीभर व कडबियाची बोली दिली पुढे गावांत कुणबावा केला दोन च्यार वर्शे गावात कुणबावा केला आसतां रहिमानखान मुसलमान याने बडगे याच्या हवाली पाटलगीची मुतालकी केली त्यावर पाच सात वर्शे मुतालकी करीत असता मुसलमानाचा मोकासा दूर जाहाला तहगीर जाहाला त्यावर रहिमानखान आपला कबिला घेऊन येतगावास आपल्या वडिलाकडे आला आणि त्याने पेशजी

बाकी होन साहासे याचा तगादा लाविला आणि व्याजसुधा हिसेब बेमुबालग केला त्यास सोडतोड देऊन करार होन सुमार ९०० नवसे केले मग मुसलमान बोलला जे तुम्हास होन संभर देतो आम्हास कबिला सुधा बादरखा माणसे सुमार २५ पंचवीस देऊन विज्यापुरास पोहोचाऊन देणे म्हणऊन बोलला त्यावर आपले पणजे लखमोजी पाटील सावंत मुसलमानास बोलले जे आपणास तीनसे होन देणे म्हणजे आपण तुम्हांस विजापुरास पोहचाऊन देऊ असे बोललियावर मुसलमानाने कबूल केले मग त्याचे होन साहासे बाकीचे राहिले ते त्याचे पदरी घालोन विज्यापुरास पोहचाऊन दिल्हा पेशजीचा कतबा होता तो त्यापासोन घेतला बडगी यास मुसलमानाने कागद दिल्हा जे तुम्हास आम्ही पाटलगीची मुतालकीस ठेवले त्यास पाटील मजकूर याने बाकीचा पैका वारला त्याची पाटलकी त्याचे स्वाधीन कर्णे त्यावर मौजे मजकूरास यावे तो दहीगावचा वाद पडला दोन वर्षे दहीगावच्या गुंतीयासी लागली तो पावेतो बडगी यानी पाटलकी केली मग गांवास आपले वडील आले मुसलमानाचा कागद बडगीयासी दिल्हा त्यानी वाचून पाहोन माघारा टाकिला आणि बोलले पाटलकी आपली आहे मुसलमान हि कोण आहेत आणि तुम्ही हि कोण होता तेव्हा त्याचा आमचा कजिया मांडला गावांत मानीनासे जाहाले मग आपण कृसणजी सूर्यवंसी धरून नेला त्यामुळे गावास धास्त पडली गाव उद्वस जाहाला गाव बहुत दिवस खराब पडला त्यावर खंडोजी घोरपडे व बाजी घोरपडे यानी मुलकास कौल दिल्हा तमामे मुलुक लाविला ते वेळेस मौजे मजकूरची वाजपुसी केली आणि दिवाणची तलब वेतगावास आली सूर्याजी बिन लखमोजी पाटील व विठोजी बिन कान्होजी पाटील हे दोघे हुजूर नेले आणि गावची लावणी करणे म्हणऊन आज्ञा केली त्यास पाटील मजकूर बोलले जे बडगे यानी

जोरावारी करून पाटलगी आपली म्हणतात त्या निमित्यें गाव पडला आहे त्यास साहेबी बोलाऊन आणोन इनसाफ करणे गावची लावणी केली जाईल त्यावर दिवाणाने विच्यारले जे बडगे कोणे गावात आहेत ते सांगणे त्यावर पाटील मजकूराने तुपारीमधे आहेत म्हणोन सांगितले मग दिवाणानी मसाला करून हुजूर बोलाऊन आणिले वाजीपुसी केली त्यास बडगे बोलले जे पाटलकी आमची आहे सावंत कोण आहेत तेव्हा सूर्याजी बिन लखमोजी पाा व विठोजी बिन कान्होजी पाटील यानी बडगी यासी मुसलमानानी कागद दिल्हा होता तो व साहासे होनाचा कतबा व्याजसुधा सोडोन आणला होता तो असे दोन्ही कागद दिवाणचे रुबरु टाकिले कागद वाचून पाहिले तेव्हा बडगी यास दिवाणानी वाजीपुसी केली जे तुझी पाटलकी असती तर मुसलमान तुजला कागद काये निमित्य देता तू खोटा आहेस असे दिवाण बोलले त्यावर बडगा बोलला जे त्यास आम्हा संगाते लाऊन देणे गोत मुखे निर्व्हा होईल तेणें प्रा वर्तणूक करू मग दिवाणांनीं उभयेतापासी जमान घेऊन आमृतेस्वरचे थल नेमून दिल्हे तेथे वाद जाहाला वादामुळे बडगे खोटे जाहाले तेव्हा बडगे यानी आती निगृह केला की सावतानी रवा काडोन खरे व्हावे म्हणजे सावंत खरे तेव्हा रव्यास हुकूम दिवाणचा पाहिजे तेव्हा दिवाणचा हुकूम घेऊन रवा सूर्याजी बिन लखमोजी पाटील सावंत याने रवा काडून बडगीयाच्या हातीं दिल्हा सूर्याजी पाटील दिव्यास खरा जाहाला उभयेता वादीये दिवाणापासी आले थलचे निवाडपत्र बाकीयास दाखविले बडगे खोटे जाहले त्यास शाबरबेदर केले आपले वडील खरे जाहाले त्यास दुमाले मिसल व कौल देऊन गावास पाठविले गावाची लावणी केली गाव लाऊन पाटलकी केली त्या तागाइत आपले वतन आपण आनभवीत आलो बडगीया खेरीज कोन्ही आपणासी

वाद सांगितला नाही अगर वतनास कोन्हीं मुजाहिम जाहला
असे आपण ऐकिले नाही येणेप्रमाणे आपला करीना सेवेसी
लेहून दिल्हा आहे येणेप्रमाणे हमशाई सीवघडें व भोवरगांव
व समाकुल पांढरीचे मुखांतरे खरे करून देऊ जर करीता यासी
अन्यथा जाहाले तर आपण गोताचे आन्याई व दिवाणचे गुन्हेगार
हे लेहून दिली तकरीर सही तेरीख छ १५ माहे जिलकाद

येणेप्रमाणे हरदुजन वादी याचे करीने लेहून घेतले त्यावर सभानाईक
श्री चे देवली बैसोन हरदोजनाचे करीने मनास आणिले यासी
पाहातां सिदोजी हरणे आग्रवादी यांनीं तकरीर केली जे विठोजी पाटील
सावत याने बडगीयाच्या वादाकरिता आपल्या वडीलास सामील केले आपले
खून च्यार जाहाले वतनासी खस्त जाहाली सावंताची पाठ राखली
येणेप्रमाणे हरणीयानी लेहून दिल्हे त्यावर संताजी पाटील यांचा तकरीरेचा
कयास पाहाता विठोजी पाटील व आपले वडील येका बीजाचे वतन
पूर्वापार आपले बडगीयाचा कजिया जाहाला तेव्हा आपले वडील
वेतगावीहून येऊन बडगे काढले टकापका दिल्हा वेव्हार सांगितला
दिव्ये घेऊन खरे जाहाले विठोजी पाटील व आपण येक येणेप्रमाणे
संताजी पाटील यानी तकरीर केली त्यावर पंचाइतानी उभयेताचा
करीना ध्यानास आणून हरदोजनास पुरसीस केली जे तुम्ही आपल्याल्या
तकरीरा केल्या आहेत त्याची पुरवणी कोन्हाचे मुखांतरे खरे करून द्याल
त्याची नावनिसी लेहून देणे त्यावरून सिदोजी हरणे यानी व संताजी
पाटील यानी साक्षीदार लेहून दिल्हे बी तपसील

| सिवघेड व भांवरगाऊ | | पांढरीवरील भाऊ व बलुते | |
|---|---|---|---|
| १ मौजे सिरटे | १ मौजे शेणोली | हमशाई भाऊ | बलुते |
| १ बीचूत | १ मौजे गोंदी | कुलकर्णी | |

१ येड
१ नरसीपूर
१ वडगाऊ
—
५

१ मौजे ताबवे
१ मौजे बाहे
१ मौजे रेयरे बुा
१ मौजे कारवे
—
६
—
११

पैकी सड्या आल्या नाहीत आजी सबब

१ कारवेकर संताजी पाा याचे सोइरे म्हणून त्यास सडी लेहून दिली नाहीत आजी सबब

३ मोकदम गावी नसता सडी आल्या नाहीत
१ शेणोली
१ गोंदी
१ सिरटे
—
३
—
४

बाकी सडीया आल्या सुमार ७

१ आंताजीपंत
१ नरसीपंत
—
२

१ केरा गुरव
१ कान्हा हजाम
१ सुभाना परीट
१ बाबदेव भट व कृष्णभट जोशी
१ नाजूक मामुलाणीन
१ खडा मुजवर
१ सटवा नाक व साकर नाक महार
१ सुभाना मांग
—
८

येणेप्रमाणे उभयेता वादी यानी साक्षेदार लेहून दिल्हे त्यावर गोतनाईकी हरदोजनास पुरसीस केली कीं तुम्ही गोहीदार लेहून दिल्हे आहेत त्यास ते जे सांगतील त्याप्रा वर्तणूक करावी आम्ही त्यास इमान घालून सडीपत्रे लेहून पाठवितो त्याचा उतर येतील त्याप्रो वर्तावे हे गोष्टीस आनेथा करील त्यास वतनास आर्थाआर्थी संमंध नाहीं ऐसी कुंठितपत्रे

लेहून देणे म्हणोन आज्ञा केली त्यावरून हरदोजनानी रजावद होऊन कुंठितपत्रे लेहून दिली बी तपसील

कुंठितपत्र सिदोजी हरणे मौजे कोळ प्रा कराड सुा खमस सलासीन मया अलफ कारणे लेहून दिल्हे कुंठितपत्र ऐसे जे आपणामधे व संताजी बिन लखमोजी सावत पाटील मौजे मजकूर याजमधे मौजे मजकूरच्या पाटीलकीचे भांडणे लागोन साहेबाच्या थलास आलो त्यावरून साहेबी हरदोजनापासोन राजीनामे व जमानकतबे व तकरीरा लेहून घेऊन आज्ञा केली की तुम्ही आपल्याल्या तकरीरा कोन्हाचे मुखे खरे करिता त्यावरून आम्ही आपलाले साक्षेदार लेहून दिल्हे त्या जे आपले सत्यें स्मरोन सडी लेहून पाठवितील तेणप्रमाणे आम्ही वर्तणूक करावी त्यास जो हिला हरकत करील तो गोताचा आन्याई दिवाणचा गुन्हेगार त्यास मात्रागमन सुरापानादिक कर्मे घडतील हे लिहून दिल्हे कुंठीतपत्र सही तेराख २२ रजब

कुंठीतपत्र संताजी बिन लखमोजी सावंत पाटील मौजे कोळ प्रा कराड सुा खमस सलासीन मया अलफ कारणे लेहून दिल्हे कुंठितपत्र येसजे आपणामधे व सिदोजी हरणे यामधे मौजे मजकूरचे पाटलकीचे भांडण लागोन हरदोजन वादीये साहेबाचे थलास आलो त्यावरून साहेबी हरदोजनापासून राजीनामे व जमानकतबे व तकरीरा लेहून घेऊन आज्ञा केली कीं तुम्ही आपले करीने लेहून दिल्हे आहेत ते कोन्हाचे मुखांतरे खरे करून देता म्हणऊन पुरसीस केली त्यावरून आम्ही आपलाले साक्षेदार लेहून दिल्हे ते जे आपले सत्ये स्मरोन लेहून पाा तेणे प्रा आम्ही वर्तावे त्यास आम्ही हिला हरकत करूं तर आपण गोताचे आन्याई व दिवाणचे गुणेगार आपणास मात्रागमन गोहत्या सुरापानादिक कर्मे घडतील आणि आपणांस आर्थाआर्थी समध नाही हे लेहून दिल्हे कुंठितपत्र सही तेरीख छ २२ माहे रजब

सदरहु प्रमाणे हरदोजनानी कुंठितपत्रें लेहून दिली त्यावर गोतनाईकी भोवर गावास गोहत्या ब्रह्महत्यादिक पातक घालोन लेहून पाा की कोन्हाची रुच्यात न करीता आपले बेतालीसाचे इनाम जे सत्यपूर्वक वडिलावडलापासोन ज्यानी देखिले ऐकिले असेल त्यात पन्हाम न करीता जे खरे असेल ते लेहून पाा म्हणोन क्रिया घालोन पत्र लेहून पाा त्याच्या सह्या आल्या बी तपसील

राजेश्री देवजी पाटील मौजे वाघेरी प्राा कराड गोसावी यासी

ᕦ) अखंडितलक्षेमी आलंकृत राजमान्ये स्नेाा मोकदमानी मौजे नरसीपुर प्राा सिराले दोन्ही कर जोडोन विनंति उपरी येथील क्षेम जाणोन गोसावी यानी आपले स्वानंदवैभव लेखन आज्ञा केली पाहिजे यानंतर आपण पत्र पाठविले ते पावले लिाा वर्तमान विदित जाहाले तेथे आज्ञा केली जे संताजी पाटील कोळेकर व सिदोजी हरणे व जोती पाटील या त्रिवर्गाचे करीने लेहून पाा त्याचा शोध कलमाचे कलम तपसीलवार मनास आणून लेहून पाठवणे म्हणोन लिाा येसीयासी संताजी पाटील व जोती पाटील या दोघा उभयेतांचा भोगवटा च्यार डोया ऐकत आलो वडिल हि सांगत हि आले इतके मात्र आपणास दखल आहे याखेरीज हरणीयाचा बायदा लिहिला तर पूर्वापार हरणे कधी ऐकिले नाहीत अगर त्याचा वादवेवाद कधी ऐकिले नाहीत आगर मोरचेतुरे कधी ऐकिले नाहीत उभयेता पाटील यांचे वडील वर्तत आले इतके मात्र आपले वडील सांगत आले आहेत येणे प्राा वडलाचे मुखे ऐकत आलो व आपले देखता हि याचप्रमाणे वर्तणूक पाहिली यामधे आपण वडील धर्मपरायेण आहेत विशेष काये लिहिणे संताजी पाटील याचा व जोती पाटील याचा मूळ पुरुशाची गोस्टी करीन्यामधे आहेत त्याचा दाखला जेणेप्रमाणे संताजी पाटील यानी करीना लेहून दिल्हा आहे त्याप्राा आपले हि वडील बोलत आले आहेत त्याचे तक्षीमेचा दाखला त्याचे पांढरीवर असेल येणेप्रमाणें आपणास दखल होते ते सेवेसी लेहून पाठविले आहे कृपा लोभ असो देणे हे विनंति

राजेश्री देवजी पाटील व मोकदम मौजे वाघेरी
प्रा कराड गोसावी यासी

॥ आखंडितलक्षेमीआलंकृत राजमान्ये स्नो मोकदमानी मौजे तावबे का कासगाऊ प्रा पनाळा दोन्ही कर जोडोन रामराम विनंति उपरी येथील क्षेम जाणोन स्वकीये लेखन करीत असिले पाहिजे यानंतर गोसावी यानी पत्र पाा ते पावले तेथे लिा जे संताजी पाटील व जोती पाा मौजे कोळ व हरणे या त्रिवर्गाचा वाद होऊन राजेश्री बळोजी सालाखियाचे व देशकाचे पत्र घेऊन आमचे थलास आले थली राजीनामे व जमान देऊन करीने लेहून दिल्हे ते बाजिनस लेहून पाा आहेत ते ध्यानास आणून इमानपूर्वक जे सत्य आसेल ते कोन्हाची रुग्यात न करिता आपले बेतालीसाचे इमान जे खरे आसेल ते लेहून पाा म्हणोन लिा तर सावताचा व हरणीयाचा वाद या माघे जाहाला असे आमच्या वडिलानी सांगितले नाही व आमचे कारकीर्दीस हि आपण ऐकिले नाही व मोरचेतुरे हि हरणीयाचे कधी जाहाले हे आपण ऐकिले नाहीत संताजी पाटील व जोत्याजी पाटील या उभयेताचे वडील वतन आनभवीत आले आहेत येणेप्रमाणे आपणास दखल आहे तुम्ही गोत काशी आहां जो निवाडा करावयाचा तो करुन विले लावणार आपण सुज्ञ आहेत कृपा केली पाा हे विनंति

राजेश्री देवजी पाटील व मोकदम मौजे
वाघेरी प्रा कराड गो

॥ आखंडित लक्षेमी आलंकृत राजमान्ये स्नो मौजे येडे प्रा पनाळा कृतानेक रामराम विनंति उपरी येथील क्षेम जाणोन स्वकीये लेखन केले पाहिजे यानंतरी गोसावी यानीं दया करुन पत्र पाा तेथे लिहिले की संताजी पाटील कोळेकर व सिदोजी हरणे या उभयेतामधे कोळीयाचे पाटलगीचा कजिया लागला आहे त्याबद्दल आपले थलास आले त्यास जोती पाटील सावंत कोळेकर यैसे त्रिवर्गानी आपल्या तकरीरा लेहून दिल्या यैसीयासी तुम्ही हमशाई लोक आहा तुम्हास जे दखल आसेल

ते लेहून पा। म्हणोन सफतपूर्वक पत्र लेहून पाठविले त्यावरून आम्हास जे दखल आहे ते लिहिले आसे कोलीयाचे पाटील पूर्वीचे जोत्याजी पाटील बिन कृष्णाजी पाटील सावंत आहेत त्याच्या वडलानी पाटलकी आनभविली व हली जोती पाटील हि आनभवीत आहे त्यास संताजी पाटील याचा आजा सूर्याजी पाटील सावंत वोगाऊकर कोळ्यास आले त्याचा लेक लखमोजी पाटील त्याचा लेक संताजी पाटील हली आहेत व जोत्याजी पाटील ऐसे उभयेता वतन आनभवीत आहेत येणेप्रमाणे आपणांस दखल आहे उभयेतांचा मूळ पुरुस येक रक्तमांस येक कीं काय म्हणऊन लिहिले तर त्या उभयेताचा येक मूळ पुरुस येकाचा वंश असे काही आपणांस दखल नाही आथवा वडिलाचे मुखे ऐकिले नाही संताजी पाटील याचे घर वोगावकर सावंत जोत्याजी पा। हे कोळेकर सावंत येणेप्रमाणे दखल आहे हरणीयाचा मजकूर तर हरणीयाची दखलगिरी आम्हास कधी आसली नाही मोरचेतुरे हरणीयाचे जाहाले हे हि कधी आसले नाहींत साराअंश गोष्ट की त्रिवर्गानी तकरीरा दिल्या तेथे लिहिले की वडगे याच्या वादानिमित्ये थलगोत जाहाली रवा दिव्ये जाहाली म्हणऊन त्यानी लिहिले तर जे थली निवाडा जाहाला ते थलीचे महजर व देशकाची व दिवाणची पत्रे आसतील त्याचा शोध तुम्ही गोतांनीं पाहिला च आसेल त्यात नांवनिसी आदिअंत वर्तमान तुम्हास विदित जाहाले च आसेल आम्हास जेणेप्रा। दखलगिरी होती तेणेप्रमाणे सेवेसी लिहिले आसे कृपा आसो देणे हे विनंति

राजेश्री देवजी पा। व मोकदम मौजे वाघेरी
प्रा। कराड गोसावी यांसी

(६) आखंडित लक्षेमी आलंकृत राजमान्ये स्नो। मोकदमानी मौजे वडगाऊ प्रा। कराड रामराम विनंति उपरी येथील क्षेम जाणून स्वकीये लेखन केले पाहिजे यानंतर आपण लिहीले की चवघे वृध व बारा बलुते यांच्या मुखे विच्यार करून संताजी पाटील व जोत्याजी पाटील मौजे

कोळ व हरणे या त्रिवर्गाचा करीना कसा आहे तो लेहून पाठवणे त्यास संताजी पाटील व जोत्याजी पाटील यांचा मूळ पुरुष येक दोन च्यार डोया पाहात आलो वडिलांनीं हि सांगितले आहे उभयेता सावंताचा मूळ पुरुष येक भोगवटा हि चालत आला आहे हरणे याचे मोर आपण कधी देखिले ऐकिले नाहींत अगर वादवेवाद हि कधी देखिले ऐकिले नाहीत संताजी पाटील व जोत्याजी पाटील या उभयेताची वर्तणूक ऐकत आलो आहो याउपरी आपणास काही दखल नाही सेवेसी श्रुत होय हे विनंति

राजेश्री देवजी पाटील व मोकदम मौजे
वाघरी प्रा। कराड गोसावी यासी

ऽ) आखंडित लक्षेमी आलंकृत राजमान्ये स्ने॥ मोकदमानी मौजे बाहे रामराम विनंति उपरी येथील क्षेम जाणून स्वकीये लेखन केले पाहिजे विशेष तुम्ही कोळकर याचे सडीविसी पत्र पाठविले त्यास मौजे कोळचे पाटलकीचा मजकूर लि॥ तो उभयेता सावताचा व हरणीयाचा ऐसा त्रिवर्गाचा करीना लेहून पा॥ म्हणोन लि॥ तर उभयेता सावत येक आजीपावेतो पाटलकी खात आले आहेत हे ऐकत आलो आहो या उभयेताचा कजिया कधी माघे भांडता ऐकिला नाही या उभयेताचा करीना ऐसा आहे तिसरा हरणीयाचा करीना तर आजी पावेतो हरणीयानी पाटलकी कधी खाल्ली हे आपण ऐकिले नाही अगर वादवेव्हार अगर मोरचेतुरे कधी हरणीयाचे जाहाले हे आपण ऐकिले नाही तया त्रिवर्गाचा करीना आपणास दखल होता त्याप्रमाणे लेहून पाठविला आहे उभयेता सावत आजीपावेतो खात आले आहेत तुम्ही गोत काशी आहा कळले पाहिजे कृपा लोभ असो देणे हे विनंति

राजश्री देवजी पाटील व मोकदमानी
मौजे वाघेरी प्रा। कराड गो॥

ऽ) अखंडित लक्ष्मी आलंकृत राजमान्य स्ने॥ मोकदमानी मौजे बिचूत प्रा। मजकूर रामराम विनंति उपरी तुम्ही दया करून पत्र पाठविलें

तेथें लिहीलें कीं संताजी पाटील कोळेकर व सिदोजी हरणे या उभयतामधे कोवीयाचे पाटिलकीचा कजिया लागला याबद्दल त्रिवर्गांनीं आपल्या तकरीरा लेहून दिल्या ऐसियासी तुम्ही हमशाई करून आहा तुम्हास जे सत्यपूर्वक दखल असेल ते लेहून पाा म्हणोन लिहीलें तर जोती पाटील सावंत व संताजी पाटील सावंत यांचे वडिलावडिलीं मिळोन पाटिलकी करीत आले आहेत हें आपले वडिलांनीं सांगितलें आहे आणि आपण हि पहात आलो असो हली जोत्याजी पाटील व संताजी पाटील करीत आहेत हरणीयाचा मजकूर लिा तर हरणीयाचा दखलगिरी कांहीं आपणास नाहीं वडलांनीं हि हरणीयाचा मजकूर सांगितला नाहीं हरणीयाचे मोरचेतुरे कधीं जाहले हे हि आपणास दखल नाहींत अगर हरणीयाचे वादवेव्हार कधीं देखिले ऐकिले नाहींत बडगे याच्या वादाबद्दल थलगोत व रवेदिव्यें जाहाली म्हणऊन लिा तर थली निवाडा जाहाला तेथील मोसर व देशकांचीं पत्रे व दिवाणचीं पत्रें असतील त्याचा शोध तुम्ही गोतांनीं पाहिला च असेल त्यावरून आदिअंत वर्तमान तुम्हांस विदित जाहालें च असेल आम्हास जे ठाउके आहे ते लिा असे त्यावर तुम्ही गोतगंगा वडील असा जें करणें तें सत्यें असेल तें करणें विशेष काय लिहीणे लोभ असो देणे हे विनंति

राजेश्री देवजी पाटील व मोकदमानी
मौजे वाघेरी प्रा कराड गोा

(६) अखंडित लक्ष्मी आलंकृत राजमान्य स्नेाा मोकदमानी मौजे रेटरे बुाा प्राा मजकूर रामराम विनंति उपरी येथील क्षेम जाणोन स्वकीये लेखन करीत गेले पाहिजे विशेष स्वामींनीं दया करून पत्र पाठविलें तें उत्तम समईं पावोन परम समाधान जाहले तेथें लिहिले जे संताजी पाटील व जोती पाटील व हरणे या त्रिवर्गाचा करीना लेहून पाठविला व भोग व भोगवटा कैसा चालला आहे तो लेहून पााा म्हणोन लिहिले ऐसीयासी सावंताचा व हरणीयाचा वाद जाहाला व मोरचेतुरे जाहाले असे कधी आमच्या वडिलांनीं सांगितलें नाही आमचे हि कारकीर्दीस ऐकिले नाहीं व हरणीयाचा

भोग भोगवटा हि नाहीं संताजी पाटील व जोत्याजी पाटील या उभयतांचे वडील वतन अनुभवीत आले आहेत हें आमचे वडिलांनीं सांगितलें च आहे आणि आपणास हि दखल आहे तुम्ही गोत काशी आहां सत्य स्मरोन जो निवाडा करावयाचा तो केला पाहिजे सुज्ञाप्रती विशेष काये लिहीणें कृपा निरंतर असो देणें हे विनंति

येणेंप्रमाणें भोवरगांवींच्या मोकदमानी सडीचीं उत्तरें पाठविली. त्यावर सभानाईक बैसोन इत्यार्थ केला कीं, समाकुल पांढरीचे भाऊबंद व बयते बलुते यासी थलमजकुरीं आणोन श्री चे देवळीं बैसोन त्याचे माथा बेलअंगारा घालोन प्रथक प्रथकाकार तकरीरा घेऊन बयेत्याच्या मुखे निवाडा कैसा होतो तो मनास आणावा मग जैसा निवाडा करणें तैसा करावा असा सिधांत करून बयेते व मिरासभाऊ यासी बोलाऊ पाा थलमजकुरास आणिले त्यावरून त्यांनीं तकरीरा केल्या बी तपसील :

तकरीर केरोजी गुरव मौजे कोळ प्राा मजकूर सुाा खमस सलासीन मया अलफ कारणे लेहून दिली साक्षेपत्र यैसे जे आपणास थलमजकुरीं आणोन आज्ञा केली कीं, संताजी पाटील व जोत्याजी पाटील व सिदोजी हरणे या त्रिवर्गांचें भांडण पाटलगीनिमित्यें लागलें आहे, तर तुझे माथा श्री चा बेलअंगारा घातला आहे. कोण्हाची रुग्यात न करितां आपले बेताळीसाचे इमान जें सत्य असेल तें सांगणें म्हणऊन आज्ञा केली त्यास संताजी पाटील व जोती पाा हे उभयेता येक उभयेताचे वडील येक वर्तत आले वतन खाल्ले. हरणीयाचा मजकूर विचारला तर हरणे कांहीं विठोजी पाटील यांनीं सामील केले गांवास आणिले अगर हरणीयाचे खून जाहले यैसे कधीं वडिलांनीं सांगितलें नाहीं आपण हि ऐकिलें नाहीं उभयेतां सावंत पाटील खरे आहेत गोतनाईकीं पुरसीस केली कीं उभयेता सात्रंताचा मूळ पुरुष येक होये कीं नव्हे म्हणऊन विच्यारले तर हे गोष्ट आपणास

दखल नाहीं, उभयेताचे वडील वतन खात आले हें आपणास दखल आहे येणेप्रमाणें आपण सेवेसी लेहून दिल्हें आहे हे देवद्वारीं व गोतघरीं खरें करून देऊ जर या कलमास आपण खोटा जाहालों तर आपणास वतनास अर्थाअर्थी समध नाहीं हे लिहिले साक्षेपत्र सही छ २३ जमा दिलावल

साक्षेपत्र बाा बाबदेव भट व कृष्णभट जोतीसी मौजे कोळ प्राा कराड सुाा खमस सलासीन मया अलफ कारणे लेहून दिल्हे साक्षेपत्र येसीजे आपणास स्थलमजकूरास आणून आपले माथा श्री चा बेल व अंगारा घालोन क्रिया घातली कीं आपले बेतालीसाचे कोण्हाची रुऱ्यात न करितां सत्यपूर्वक खरें असेल तें सांगणें संताजी पाटील व जोत्याजी पाटील व हरणे हे त्रिवर्ग पटलगीसाठीं भांडतात त्यास त्यांचे यांचें कसें आहे तें सांगणें म्हणोन आज्ञा केली तर संताजी पाटील व जोत्याजी पाटील मौजे मजकूर या उभयेतांचा मूळपुरुष येक लखमोजी पाटला तागाईत पाटीलकी करीत आले उभयतांचे वडील बरोबरी वर्तत आले. येणे प्राा आपण वडिलांचे मुखें ऐकिले हरणीयाची नांदणूक गांवावर कधीं च देखिली ऐकिली नाहीं अगर हरणीयाचे खूनखराबी कोण्हे समयीं कोणे जागा जाहाली तें वडिलांनीं कांहीं सांगितली नाहीं हरणे आपण ऐकिले नाहींत आपणास दखल होतें तें सेवेसी लेहून दिल्हे असे यानंतर साहेबीं पुरसीस केली कीं बडगे पाटलकीस माघजडले तें समयीं जोत्याजी पाटलाचे वडिलीं हरणीयासी सामील करून घेऊन गांवास आणोन जोत्याजी पाटलाचे वडिलीं व हरणीयाचे वडिलीं बडगे यासी वादवेव्हार तीन वर्षे सांगून सावंताकरवी दिव्यें घेऊन बडगे खोटे केले म्हणऊन हरणीयांनीं भाविलें आहे आणि तुम्ही केवळ हरणे पाहिले नाहींत म्हणतात तर हें वर्तमान कैसें आहे तें सांगणें म्हणोन आज्ञा केली तर मोकासी यानें बडगीयासी मुतालकी सांगितली पांच सात वर्षे बडगे यांनीं मुतालकी पाटीलकीची केली पुढें मोकासी निघोन गेला तो येतगांवीं जाऊन राहिला मग संताजी पाटलाच्या

वडिलीं व जोत्याजी पाटलाचे वडिलीं मोकासी याचा टकापैका वारून त्यास विज्यापुरास नेऊन घालविला तेव्हां मुसलमान मोकासी यानें बडगीयासी पत्र दिल्हें कीं, तुजला मुतालकीस ठेविले होते त्यास सावंतांनीं आमचा टकापैका वारून आमचा भाग वारीला वतन सावंताचे त्याचें त्याचे स्वाधीन केले असे तर तुम्ही सावंताची पाटलकी सावंताचे हवाला करणें म्हणऊन मोकासीयाचें पत्र घेऊन जोत्याजी पाटलाचे वडील गांवास आले बडगे यासी पत्र दिल्हे तेव्हां बडगे पत्रास लेखीनासे जाहाले तेव्हां उघड उपाय जोत्याजी पाटलाचे वडिलीं केले परंतु बडगे यांनीं मानिले नाहीं जोत्याजी पाटलाचे वडील व ते गांवास गेले आणि संताजी पाटलाच्या वडिलास आणोन दोघांनीं बडगीसी वाद सांगितला दिवाणदरगा केला दिवाणानीं गोत लाऊन दिल्हे गोतमुखें बडगा खोटा केला तेव्हां गोतास बडगीयानीं उरमोडिले तेव्हां दिव्ये सावंतांनीं ध्यावे ऐसा इत्यार्थ जाहाला ते समयीं सावंतानीं दिव्य घेतले दिव्यास सावंत खरे जाहाले मग दिवाणानी बडगीयासी मार देऊन लाऊन दिल्हे ऐसे वडिलावडील सांगत आले. बडगीयाच्या वादामधें हरणे कधीं आले हें ऐकिलें नाहीं अगर वडिलीं सांगितलें नाहीं. संताजी पाटील व जोत्याजी पाटील हे उभयता येका रक्तामांसाचे याचा त्याचा वंश येक आहे येणेप्रमाणें आपणास दखल होतें तें सेवेसी लेहून दिल्हे असे याशिवाय आपणास कांहीं दखल नाहीं दखल असोन प करू तर गोताचे अन्यायी दिवाणचे गुन्हेगार हें लेहून दिली साक्षेपत्र सही तारीख २३ माहे जमादिलावल

तकरीर ब्रोा सुभानजी परीट मौजे कोळ प्राा कराड सुाा खमस सलासीन मया अलफ कारणे लेहून दिल्हे साक्षेपत्र यैसींजे साहेबी आपणास थलमजकुरास आणून आपले माथा बेल व अंगारा घालोन कोण्हाची रुग्यात न करितां सत्य असेल तें सांगणें संताजी पाटील व जोत्याजी पाटील हरणे हे त्रिवर्ग पाटीलकीच्या मोकदमासाठीं भांडतात तर आपले बेतालीसाचे इमान जें सत्य असेल तें सांगणें

म्हणऊन आज्ञा केली त्यास संताजी पा। व जोत्याजी पाटील यांचा मजकूर आपणास कांहीं दखल नाहीं आपण नेणता होतो ते समयीं मोगलाईंत गेलों ते कधींचे सालीं गांवावर आलों कांहीं आपणांस दखल नाहीं हरणीयाचा कजिया हि आपणास दखल नाहीं येणेप्रमाणें आपणास दखल होते तें सेवेसी लेहून दिल्हे असे यासी आनेथा असेल तर आपणास वतनास समंध नाहीं हे लेहून दिली तकरीर सही तारीख २३ जमादिलावल

तकरीर को। बा। कान्होजी बिन हज्याम मौजे कोळ प्रा। कराड सु॥ खमस सलासीन मया अलफ कारणे लेहून दिल्हे साक्षेपत्र यैसी जे आपणास साहेबी स्थलमजकुरास आणून आपले माथा श्री चा बेलअंगारा घाढून कोण्हाची रुस्यात न करितां जें सत्य असेल तें सांगणे म्हणऊन आज्ञा केली संताजी पाटील व जोत्याजी पाटील व हरणे हे त्रिवर्ग पाटीलकीच्या मोकदमाविसी भांडतात हें वर्तमान कैसें आहे तें तपशीलवार सांगणे म्हणोन आज्ञा केली तर संताजी पाटील व जोत्याजी पाटील या उभयतांचे मूळपुरुष येक लखमोजी पाटील याजपासोन पाटीलकी करीत आले येणेप्रा। आपल्या वडिलाचे मुखें ऐकिलें असे हरणीयाचा मजकूर कधी ऐकिला नाहीं अगर मोरचातुरा अगर नांदणूक कधीं देखिली ऐकिलीं नाहीं येणेप्रा। वडिलाचे मुखें ऐकत आलों आपणास हि दखल होतें तें सेवेसीं लेहून दिल्हे असे यासी आनेथा असेल तर गोताचे अन्यायी दिवाणचे गुन्हेगार आपणास वतनास समध नाहीं हें लेहून दिल्हे साक्षेपत्र सही तरीख २३ जालौवल

तकरीर नाजूक मामुलाणीन मौजे कोळ प्रा। कराड सु॥ खमस सलासीन मया अलफ कारणें लेहून दिल्हे साक्षें ऐसीजे आपणास थलमजकुरास आणोन आज्ञा केली कीं तुझे माथा श्री चा बेलअंगारा आहे कोण्हाची रुस्यात न करितां जें सत्य असेल तें खरेंखुरें सांगणें संताजी पाटील व जोत्याजी पाटील व हरणे

पाटिलकीसाठीं भांडतात त्यास कोण्हाची रुज्यात न करितां आपले बेतालीसाचें इमान सत्यपूर्वक सांगणे म्हणोन आज्ञा केली तर संताजी पाा व जोत्याजी पाटील हे उभयता आजीपावेतो गुलगोडीनं चालले माघ कांहीं कजिया खलोला जाहला नाहीं हरणीयाचा मजकूर विचारला तर हरणे आपणांस कांहीं दखल नाहीत येणप्रमाणे आमचे आईनें सांगितलें तें आपण सेवेसी निवेदन केले आहे यासी आनेथा असेल तर आपण गोताचे अन्यायी दिवाणचे गुन्हेगार आपणास वतनास अर्थाअर्थी समंध नाहीं हे लेहून दिली साक्षे सही तरीख २३ जमादिलावल

तकरीर कर्दे खो खंडोजी नाटकर मुजवर मौजे कोळ प्राा कराड सुाा खमस सलासीन मया अल्फ कारणे लेहून दिल्हे साक्षेपत्र येसीजे आपणांस थलमजकुरास आणून आपले माथा श्री चा बेल व अंगारा घालून आपणास विचारले कीं संताजी पाटील व जोत्याजी पाटील व हरणे असे त्रिवर्ग पाटिलकीसाठीं भांडतात त्यास कोण्हाची रुज्यात न करितां आपले बेतालीसाचे इमान सत्यपूर्वक जे सत्य असेल ते खरेखुरे सांगणें म्हणऊन पुरसीस केली तर संताजी पाटील व जोत्याजी पाटील हे उभयेता आजीपावेतो दोघे जण येक विचारे चालत आले वडलावडला-पासोन पाटीलकी करीत आले कधीं भांडले हे आपण ऐकिले नाहीं हरणीयाचा मजकूर विचारला तर हरणे आपणास दखल नाहीत हरणीयाचे मारेचुरे अगर वादवेव्हार कधी वाडिलांनी सांगितले नाहीत आपण ऐकिले नाहीत जें आपणांस दखल होतें ते सेवेसी लेहून दिल्हे असे याशिवाय आपणास कांहीं ठावके असोन पन्हाा करूं तर गोत्याचे अन्यायी दिवाणचे गुन्हेगार आपणास वतनासी अर्थाअर्थी समंध नाहीं हे लेहून दिली तकरीर सही तारीख २३ जमादिलावल

साक्षेपत्र बो अंताजी सामराज व नरसो सिवदेव कुलकर्णी मौजे कोळ प्राा कराड सुाा खमस सलासीन मया व अलफ कारणे लेहून दिली साक्षे अैसीजे आपणास स्थलमजकुरास आणोन आपले माथा श्री चा बेल व अंगारा घालोन आपणास मंडळांत उभे करून आज्ञा केली कीं

संताजी पाटील व जोत्याजी पाटील सावंत व सिदोजी हरणे असे त्रिवर्ग पाटलकीसाठीं भांडतात या त्रिवर्गाचा मजकूर कैसा आहे त्यास तुम्ही आपले बेतालीसाचे इमानें कोण्हाची रुप्यात न करितां तुमच्या वडलावडलांनीं सांगितलें असेल तुम्ही देखिलें ऐकिलें असेल ते सत्ये स्मरोन सांगणे म्हणोन आज्ञा केली त्यास संताजी पाटील व जोत्याजी पाटील या दोघाचा दाखला तर लखमोजी पाटील व कान्होजी पाटील देखील चार पुरुष वर्तत आले उभयतांचा मूळ पुरुष येक ऐसे वडलांचे मुखें ऐकत आलों हरणीयाचा मजकूर आपण ऐकिला नाहीं व खून खराबी जाहाली म्हणऊन हरणीयानी भाविले तर हरणीयाचे खून कधीं जाहाले हें वडलावडलापासोन आपणास आढळले नाहींत अगर वादवेव्हार कधीं हरणीयानीं केला ऐसें वडलानी सांगितला नाहींत हरणे आपणास कधीं आढळले नाहींत इतकें आपणांस दखल आहे त्यावरी गोतनाईकीं पुरसीस केली कीं हरणीयानी तकरीर केली आहे कीं मुसलमान मोकासी होता त्याच समयीं पाटलकी घेतली तें सावंतास निघनासे जाहाले तेव्हां जोत्याजी पाटलाच्या वडलानीं हरणाक्ष्याच्या रेटरेस जाऊन हरणेस पाठराखे करून गांवास आणले त्यावरून हरणीयानी वाद सांगोन बडगीयाचे जरजर केले मग जोत्याजी पाटलाच्या वडिलीं दिव्य घेतले बडगे खोटे करून शाबरवेदर केले म्हणऊन भाविले आहे आणि तुम्ही हरणे कधीं देखिले ऐकिले नाहींत म्हणता तर सत्येपूर्वक जें असेल तें सांगणें म्हणोन पुरसीस केली तर मुसलमान मोकासी होता हें खरे आहे त्यांनीं सावंतावर कसाला केला त्याकरितां जोत्याजी पाटलाचे वडील गांवातून वरीस दोन वर्षे बाहेर गेले मोकासी मजकूर पाटीलकी करीत असतां त्याने बडगे यासी मुतालकी सांगोन कामावर ठेवले त्यावर मोकासी याचा मोकासा दूर जाहाला मग सावंत आले बडगे यासी म्हणो लागले कीं तूं कोण आहेस म्हणता बाडगे ऐकेनासे जाहाले ते समयीं जोत्याजी पाटलाचे वडलानीं वेतगांवास जाऊन संताजी पा। सावंत याचे वडिलाच्या गळा पडिले कीं तुम्ही वडील भाऊ वतन

तुमचें ऐसें असतां दरम्यान बडगे शिरोन पाटलकीचें वतन आपलें म्हणतात तर तुम्ही गांवास चालणे बडगे यासी वाद सांगोन लाऊन देऊं ऐसें बोलोन संताजी पाटलाचे वडलास गांवास आणले दोघे सावंतांनीं वादवेव्हार सांगितला शेवटीं दिव्य घेतलें दिव्यास सावंत खरे जाहाले मग दिवाणांनीं बडगीयासी शाबर बेदर ( ? ) करून लाऊन दिल्हे बडगे याच्या वादामधे हरणे कधीं देखिले ऐकिले नाहींत संताजी पा व जोत्याजी पाटील या दोघांचें रक्तमांस येक या दोघांमधें भिन्न भेद कांहीं नाहीं या दोघांमधें कधीं भांडण झगडा जाहला ऐसे वडलाचे मुखांतरें ऐकिलें नाहीं जें आपणास दखल होतें तें सेवेसीं लेहून दिल्हे असे याशिवाय आपणास कांहीं दखल असोन पन्हा। करूं तर दिवाणचे गुन्हेगार गोताचे अन्यायी आपणास वतनास अर्थाअर्थी समंध नाहीं हें लेहून दिली तकरीर सही तरीख २३ जमादिलावल

तकरीर कों बो सटवानाक बिन देवनाक व साकरनाक बिन गुलबानाक महार मेहेतर मौजे कोळ प्रा। कराड सु॥ खमस सलासीन मया अलफ कारणे लेहून दिली तकरीर ऐसीजे आपणास स्थलमजकुरास आणोन आपले माथा श्री चा बेलअंगारा घालोन आपणास मंडळांत उभे करून पुरसीस केली कीं संताजी पा। सावंत व जोत्याजी पाटील सावंत हे उभयतां व हरणे ऐसे त्रिवर्ग पाटलकीसाठीं भांडतात तर तुम्ही महार तुमची साक्षे म्हणजे थोर आहे महार इमानी असतात तुमचे माथा क्रिया घातली आहे तर कोण्हाची रुप्यात न करितां आपले बेतालीसाचे इमान जे खरी गोही असेल ते देणें तुम्ही काय बोलता ते तुमचे पूर्वज वाट पहात असतील लटके हरगीस न बोलणें म्हणऊन आज्ञा केली तर कान्होजी पाटील बिन गंगाजी पाटील लखमोजी पाटील बिन सिदोजी पाटील त्या तागाईत उभयतां येकविचारें चालत आले उभयतां पाटील येक आहेत दोघांचें रक्तमांस येक ऐसे वडलावडील सांगत आले आहेत हरणीयाचा मजकूर विचारला तर हरणे कधीं गांवावर नांदले नाहींत खून खराबी हरणे जाहली म्हणतात तर हरणीयाचे खून

कधीं जाहले नाहींत अगर हरणीयानीं सावंतासी कधीं वादवेव्हार सांगितला ऐसे आपले वडिलांनीं सांगितला नाहीं अगर ऐकिला नाहीं हरणे कधीं हि आढळले नाहीत इतकें आपणास दखल आहे त्यावर गोतनाईकीं पुरसीस केली कीं हरणीयांनीं तकरीर केली कीं मुसलमान मोकासी होता त्याचे समयीं बडगे यांनीं पाटलकी घेतली ते सावंतास निघेनासे जाहाले तेव्हां जोत्याजी पाटलाचे वडिलांनीं हरणाचे रेटरेस जाऊन हरणीयास पाठराखे करून गांवास आणिले त्यावरून हरणीयानीं वाद सांगोन बडगी-यास जरजर केले मग जोत्याजी पाटलाचे वडिलीं दिव्य घेतलें बडगे खोटे करून शाबरबेदर केले म्हणऊन भाविले आहे आणि तुम्ही हरणे कधीं देखिले ऐकिले नाहींत म्हणता तर सत्येपूर्वक असेल ते सांगणें म्हणोन पुरसीस केली तर मुसलमान मोकासी होता हे खरे च आहे त्यांनीं सावंतावर कसाला केला त्याकरितां जोत्याजी पाटलाचे वडील गांव टाकून वरीस दोन वर्षे जाऊन वेतगांवांत राहिले मग मोकासी याचा मोकासा फिरला मग जोत्याजी पाटलाचे वडील गांवावर आले तो गांवीं बडगे पाटलकीचीं कामें कारभार करूं लागला हे पाहून सावंत त्यास म्हणूं लागले कीं तूं कोण आहेस पाटीलकी काय सबब करितोस म्हणोन विच्यारिलें तेव्हां बडगे म्हणोन लागले कीं आमची पाटलकी आम्ही करितो ऐसा सावंतास जाब दिल्हा तेव्हां बडगीयासी सावंतांनीं कजिया करून पाहिले परंतु बडगे सावंतास रेटेनासे जाहाले मग जोत्याजी पाटील याच्या वडिलांनीं मागती वेतगांवास जाऊन संताजी पाटील सावंत याचे वडिलाचे गळा पडिले कीं तुम्ही वडील भाऊ वतन तुमचें ऐसे असतां दरम्यान बडगे शिरोन पाटीलकीचें वतन आपले म्हणतात तर तुम्ही गांवास चलणे बडगे यासी वाद सांगोन लाऊन देऊं ऐसें बोलोन संताजी पाटलाचे वडिलास गांवास आणिले दोघा सावंतांनीं वादवेव्हार सांगितला मग सावंतांनीं रवा घेतला रव्यास सावंत खरे जाहाले मग दिवाणांनीं बडगे यासी मार देऊन लाऊन दिल्हे इतकें आपणास दखल आहे बडगीयाचे या वादामधें हरणे कधीं आले ऐसें

वडिलांनीं सांगितलें नाहीं अगर आपण ऐकिलें नाहीं संताजी पा। व जोत्याजी पाटील हे उभयतां सावंत येका मूळपुरुपाचे आहेत या दोघामधें कांहीं भिन्न भेद नाहीं या दोघांत भांडणझगडा कधीं जाहला ऐसें ऐकिलें नाहीं आपणांस दखल होते तें सेवेसी लेहून दिल्हे असे याशिवाय आपणास कांहीं दखल नाहीं दखल असोन पन्हा।। करूं तर गोताचे अन्यायी दिवाणचे गुन्हेगार आपणास अर्थाअर्थी समंध नाहीं हे लेहून दिली तकरीर सही तेरीख २३ माहे जमादिलोवल

तकरीर कों। बो। सुभान नाक बिन शिवनाक मांग मौजे कोळ प्रा। कराड सु।। खमस सलासीन मया अलफ कारणे लेहून दिली तकरीर ऐसीजे आपणास स्थलमजकुरास आणून मंडलांत उभे करून आपले माथा बेलअंगारा घालोन पुरसीस केली की संताजी सावंत व जोत्याजी सावंत पाटील मौजे मजकूर व हरणे ऐसे त्रिवर्ग पाटीलकीसाठीं भांडतात त्यास मांग म्हणजे वतनदार तुझी गोही रुजु असे तर तूं कोण्हाची रुव्यात न करितां आपले बेतालीसाचे इमानाने जे सत्य असेल तें सांगणे तुझे पूर्वज नरकामधे लटकी गोही दिलीस म्हणजे पडतील जें खरेंखुरें तुझे वडलावडलानीं सांगत आले असतील आणि देखत ऐकत आला असेल तें सांगणें म्हणोन पुरसीस केली तर संताजी पाटील व जोत्याजी पाटील हे उभयता वडलावडलापासोन पाटीलकी करीत आले आपले वडिलांनीं सांगितले आहे आणि आपण पहात आलो असो सिदोजी हरणे याचा मजकूर आपणास विचारिला तर आपणास हरणे कांहीं दखल नाहींत अगर हरणीयाची खूनखराबी ऐकिली नाहीं अगर हरणे यानीं कधीं वादवेव्हार जाहला ऐसे वडिलांनीं सांगितलें नाहीं जें आपणास दखल होतें तें सेवेसी लेहून दिल्हे असे याशिवाय आपणास दखल असोन पन्हा।। करूं, तर गोताचे अन्यायी दिवाणचे गुन्हेगार आपणास वतनास अर्थाअर्थी समंध नाहीं हे लेहून दिली तकरीर सही तरीख छ २३ जमादिलोवल

सदरहु प्रमाणें भोवरगांव व समाकुल पांढरीनें साक्षी दिल्या त्यावर गोतनाईकी श्री चे देवळीं सभा करून बैसोन भोवरगांव समाकुल पांढरीच्या गोह्याचा मजकूर मनास आणून समस्तानी इत्यर्थ केला कीं माघे बडगे याच्या वादावेव्हाराबद्दल थल पडथल होऊन दिव्य सावंतानी घेऊन खरे जाहले बडगीयासी शाहारबेदर केले ऐसें भाऊन तकरीरा लेहून दिल्ह्या आहेत त्यास थलची थलपत्र व दिवाणच्या दुमाले मिसली व देशकाचीं पत्रें असतील तें वादीयापासोन आणवावीं त्यांत मजकूर कैसा आहे त्याचा शोध करून मग निवाडा करावा ऐसा सिधांत करून संताजी बिन लखमोजी सावंत पाटील मौजे मजकूर यास रुबरु आणून पुरसीस केली की, माघे बडगीयासी वाद तुम्ही सांगोन दिव्य घेतलें म्हणोन लेहून दिल्हें आहे त्याची थलपत्रे व दुमाले मिसली व देशकाचीं पत्रे जे असतील ते आणोन दाखवणे म्हणोन आज्ञा केली त्यावरून संताजी पाटील यानें तकरीर केली कीं बडगीयाच्या वादाचे कागद होते आपणाजवळ परंतु बहूलखानाचे राजीक जाहाले ते समयीं आपली माळी जाळली त्याबरोबर कागद अगदीं गेले पहिले कागद आपणाजवळ कांहीं नाहींत आपणाजवळ कागद असोन पन्हाा करूं तर गोताचे अन्यायी ऐसे बोलोन लेहून दिल्हे त्यावर सिदोजी बिन हरणे रुबरु बोलाऊन पुरसीस केली कीं तुम्ही भाविलें कीं विठोजी बिन कान्होजी पाटील सावंत याने आपल्या वडिलास सामील करून घेऊन गांवास आले बडगे यासी वाद सांगितला बडगी आपण खोटी केली वतन आपल्या वडिलांनी खाल्ले ऐसे लेहून दिल्हे त्यास ते समईचे समापत्र अगर पांढरीचें पत्र अगर दिवाणचीं पत्रें अगर देशकांचीं पत्रें तुम्हाजवळ काय असतील ते रुबरु आणोन दाखविणें अगर खूनखराबी जाहाली म्हणऊन लेहून दिल्हे आहेत याची पुरवणी कैसी करता तें सांगणें म्हणऊन पुरसीस केली त्यावरून सिदोजी हरणे यानें जाब दिल्हा कीं सावंताचें समापत्र आपणाजवळ नाहीं अगर वादावेवादाचे कागदपत्र तुम्ही विचारिले ते कांहीं आपणाजवळ नाहींत म्हणोन जाब दिल्हा त्यावरून गोतानी

आज्ञा केली कीं तुजपाशीं कागदपत्र असोन नाहीं म्हणशील तुझें खरें कैसीयावरून मानावे जर करितां कागद असोन पन्हाा करून नाहीं म्हणों तर आपण गुन्हेगार म्हणऊन बोलोन कतबा लेहून दिल्हा त्यावर समस्त गोतगंगा बैसोन उभयताच्या तकरीरेचे कयास पाहिले व भोवरगांवीच्या सडीयाचा मजकूर मनास आणिला समाकुळ पांढर रुबरु आणोन प्रथकाकार अवघीयांच्या माथा बेलअंगारा घालोन तकरीरा घेतल्या त्याचा सूड मनास आणितां संताजी पाटील यानें भाविले होते कीं जोत्याजी पाटील व आपण येक रक्तमांस येक ते व आपण उभयता वतनावर कसाले सोसून टकापैका देऊन कजियेखोकले सोसले वतनाची नफरी केली बडगीयासी वादवेव्हार केला दिव्यमुखे बडगे खोटे करून शाबरबेदर केले त्याचा रुजुमोझा पाहातां सिवधडे भावानीं हि तेसे च लेहून पाठविले समाकुल पांढरीच्या मुखांतरें शोध पहातां संताजी पाटील व जोत्याजी पाटील येका रक्तामांसाचे येक वंश त्याचे याचे घर येक बांधोनी मिळोन टकापैका देऊन मुसलमानाचे कजिये वारले बडगीयासी वाद सांगोन दिव्य घेऊन सावंत खरे जाहले ऐसी साक्ष समाकुल पांढरीचे विद्यमाने खरी जाहाली सिदोजी बिन हरणे याचा तकरीरेचा सूड पहातां विठोजी सावंत पाटील यानी बडगीयाच्या वादाबदल आपल्या वडिलास सामील करून पांढरीवर आणिले आपले खून बडगेने च्यार केले तीन वर्पे वाद सांगितला वतन साधले बडगे मारून काढले वतनावर भोगवटा आपला व सावंताचा आहे आपण सावंतानी वतन खाल्ले ऐसे भाविले त्याचा रुजुमोझा भोवरगांव व समाकुळ पांढरीच्या मुखांतरें पाहातां अवघीयांनीं साक्ष दिली कीं हरणेचा कजिया कधीं आपण ऐकिला नाहीं अगर हरणे कधीं देखिले ऐकिले नाहींत अगर हरणेयाचे मारेचुर हि आपणास दखल नाहींत अगर हरणे यांनीं पाटीलकी केली ऐसें वडलावडलांनीं सांगितलें नाहीं म्हणोन अवघीयांनीं साक्ष दिली त्यावर कागदपत्र कांहीं हरणीयापाशी असतील त्यावरून तऱ्ही याचा कांहीं थाला लागेल ऐसा शोध पाहातां कागदपत्र

हि आपणाजवळ कांहीं नाहींत म्हणोन हरणे यानें लेहून दिल्हे तेथें हि कांहीं हरणीयाचा थाला लागत नाहीं ऐसा शोध मनास आणून सिदोजी बिन हरणे यासी रुबरु बोलाऊन आणून आज्ञा केली कीं तुम्ही तकरीर केली त्यास त्याचा मोझा येक हि पुरवला नाहीं भोवरगांव व समाकुळ पांढरीच्या विद्यमाने आपला भोगवटा पांढरीवर आहे आपले मारेचुर पांढरीनिमित्य जाहाले ते आपण समाकुल पांढरीच्या व शिवधडीयाच्या मुखांतरें खरे करून देऊं म्हणोन लेहून दिल्हे त्याचा मोझ्या मनास आणितां अवघीयांनीं लेहून दिल्हे कीं तूं खोटा आहेस तुजला वतन फिटत नाहीं म्हणऊन लेहून दिल्हें आहे समस्तांच्या मुखांतरे तूं खोटा जाहालास तुजला वतनासी संमंध नाहीं तुम्ही आपण खोटा आपणास वतनासी अर्थाअर्थी संमंध नाहीं ऐसे कुंठित पत्र लेहून देणे म्हणऊन तगादा केला त्यावरून सिदोजी बिन हरणे यांनीं कुंठितपत्र लेहून दिल्हे बी तपसील

कुंठितपत्र बो। सिदोजी बिन हरणे सु॥ ख्मस सलासीन मया अलफ कारणें लेहून दिल्हे कुंठितपत्र ऐसे जें आपणामधें व संताजी पाटील सावंत यामधे मौजे कोळ येथील पाटलकीचा गर्गशा लागला त्याबद्दल उभयतां हुजूर जाऊन हुजूरचे कागद घेऊन तुमच्या थलास निवाडियाबद्दल आले त्यावरून तुम्ही राजीनामे व जमानकतबे घेऊन हरदोजणाचे करीने लेहून घेतले त्यावर करीने कोणाचे मुखांतरें खरें करिता म्हणोन पुरसीस केली त्यावरून आपण भोवरगांव व समाकुळ पांढरीच्या विद्यमाने खरें करून देतों म्हणोन लेहून दिल्हे त्यावरून तुम्ही भोवरगांवास शपथक्रिया घालोन सडी लेहून पाठविल्या व समाकुल पांढरीस स्थलमजकुरीं आणोन त्यास इमानप्रमाण घालोन त्याचा शोध करितां अवघीयानीं हरणे कधीं पाहिले नाहींत हरणीयाचा भोगवटा गांवावर नाहीं मारेचुर हरणीयाचे जाहाले ते गलत आहेत कोणास हि दखल नाहींत म्हणोन साक्षे दिली आपले तकरीरप्रमाणें मोझे मोकाबले पुरविले नाहींत आपण खोटा जाहालों आपणास वतनास

अर्थाअर्थी संमंध नाहीं दुसरेन आपण कांहीं बोललों अगर वतनाची गोस्ट काढली अगर आपल्या वंशांतील जो कोण्ही कांहीं म्हणेल त्यास गोहत्या ब्रह्महत्या मात्रागमन सुरापानादिक कर्मे घडतील तो गोताचा अन्यायी दिवाणचा गुन्हेगार हे लेहून दिल्हे कुंठितपत्र सही तरीख २५ माहे जिल्काद

येणे प्रो सिदोजी बिन हरणेनें कुंठितपत्र सभेहुजूर लेहून देऊन थल मजकुरीतून निरोप घेऊन गेला सिदोजी बिन हरणे खोटा जाहाला त्यास वतनास अर्थाअर्थी संमंध नाहीं संताजी बिन लखमोजी सावंत व जोत्याजी बिन कृष्णजी सावंत पाा हे उभयता हे खरे जाहाले या उभयतांनीं वतनाची सेवा करून इनामपालक सेवाधार पटीपछोडी व गाउडमोट व पानमान व तश्रीप महार नांगर पूर्वापार उभयतामधे जैसे चालत असेल त्याप्रा उभयतानी खाऊन दिवाण नफरी करून सुखरूप असावे या निवाडियासीं कोण्ही शेब्द लावावयासी गरज नाही हिदु होऊन शेब्द लावील त्यास काशीमधे गोहत्या ब्रह्महत्या मात्रागमन सुरापानादिक कर्मे घडतील मुसलमान होऊन शेब्द ठेवील त्यास मकेमधे सोर मारलियाचा दोष लागेल हे स्थलपत्र लेहून दिल्हे सही

वळी सुमारी जिल्हे व मुसेदर व बीत व रकाने

१३३६

ताा

१०५७ बीत
२०९ मसूदर
३६ रकाने
१३ जिले
२१ इरेफ

---

१३३६

येकूण बंद चोपन वळी तेरासे छेतीस रांस



लेखांक ७ ] १६६३ श्रावण वद्य ३ १७४१ ऑगस्ट ता. १८ [ अस्सल - मोडी

श्री

०॥ ७)




सौ संताजी बिन लखमोजी व जोती बिन कृस्णाजी पाटील सावंत मौजे कोळें प्रा कराड यासी माहादाजी कृस्ण अजहत देशमुख व देशपांडे व बालोजी सालोखी देशचौगले पा मार सुा इसने अर्बैन मया अलफ तुम्हा उभयतांत व सिदोजी हरणा यांत पाटीलकीचा कजिया लागला याजकरितां हरदोजणाचा हुजूर आणून पुरसीस केली त्यावरून सिदोजी हरणा यानें वर्तमान विदित केलें जे आपले वडील हरणाक्षाच्या रेटरेंत होते ते समयीं विठोजी सावंत पाटील मौजे मजकूरची पटेलकी करीत होता तेव्हां मानाई बंडगी इनें पाटीलकी घेतली सावंतास निघेनासी जाली मग विठोजी पाटील सावंत हे अंबाजी हरणे आपले पणजे रेटरेत होते त्याजकडे आले आणि त्यास सामील करून घेऊन मौजे मजकूरास आले उभयतांनीं बांडगीसी वाद सांगितला बांडगीने आपले खून च्यार केले व विठोजी सावंत याचा खून येक केला पुढे मनसुभीमुळें दिव्य घ्यावेसें जाहालें, विठोजी पाटील सावंत याने दिव्य घेतले खरा जाहाला बांडगी खोटी जाहाली, त्यापासून सावंत व आपण वतन अनभऊन होतो त्यावरी काल पडिला आपण उठोन मोगलाईत गेलो कितेका दिवसांनीं आलों तो सावंत पाटीलकी करीत होते त्याचा व आपला कजिया जाहाला रा॥ भानजी गोपाळ सुभेदार होते त्यांनीं व देशकांनीं उभयतास घलालवार्डीचे थल लाऊन दिल्हे होते तेथे निवाडा जाहाला नाहीं मग दिवाणांनीं व देशकांनीं आज्ञा केली जे उभयतां गांवांत जाऊन कुणबावा करणे सराईस आम्ही गांवास येऊन उभयताचा कजिया मनसुभीमुळें वारून देऊ म्हणून आज्ञा केली त्यावरून गांवांत कुणबावा करून

होतों त्यावरी मनसुभी जाहाली नाहीं मागीतीं काळ पडिला मुलुक पडिला आपण हि देशावरी गेलो त्याजवरी हली आलो आहे येणे प्रमाणें आपला करीना आहे म्हणून विदित केलें त्याजवरून मौजे वाघेरी पाा मजकूर येथील थल नेमून तुम्हास थलास पाठिविले त्यास थलीं निवाडा जाहाला सिदोजी हरणा खोटा जाहाला त्यास वतनासी अर्थाअर्थी कजिया करावयास संमंध नाहीं वाघेरीचे थलीं निवाडा जाहाला त्याचे निवाडेपत्र तुम्हापासीं आहे त्याप्रमाणे उभयता वतन अनभऊन सुखरूप राहणे तुम्हा उभयतामध्यें जो कोण्ही हरण्याचा

पक्ष करील त्यासी वतनासी संमंध नाहीं, वंशपरंपरेनें उभयता वतन अनभऊन सुखरूप राहणे जाणिजे छ १७ माहे जमादिलाखर

१




लेखांक ८ ] १६७९ पौष शुद्ध ११ १७५८ जानेवारी ता. १९ [ नक्कल-मोडी

श्री शंकर

आज्ञापत्र राजेश्री पंतप्रधान ताहा मोकदमानीं मौजे कोळे नरसिहपुर प्राा शिराळे सुाा समान खमसैन मया व अलफ मौजे मजकूरचे अग्राहार-समंधे जिवाजी गोसावी व जिवाजी व्यंकटेश याचा + + आहे त्यास जिवाजी व्यंकटेश पंचाइतमतें न समजतां कजिया गोसावीयासी करितो तुम्ही लबाडी करून जिवाजी व्यंकटेशापासोन कजिया जिवाजी गोसावीयासी करविता म्हणून गोसावी मजकूरानीं विदित केले त्यास वाजबी असेल तसे उभयेतास पंचाईतमतें समजवावे ते न करितां जिवाजी व्यंकटशास हातीं घेऊन गोसावीयाचा नाश करितां उपद्रव देता घर

१ मागें जोडांवर मोर्तबसुदचे शिक्के

लुटवावयासी गरज काये हाली आज्ञापत्र सादर केलें असे तरी तुम्ही कोणासी हि उत्तेजन न देतां वाजबी पंचाईत करून वाजबी असेल तसें उभयेतांस सम (जा) ऊन विल्हेस लावणे गैरवाजबी केलीयास मुलाहिजा होणार नाहीं जाणीजे छ ८ जमादिलावल आज्ञाप्रमाण



लेखांक ९ ] १७१२ आश्विन वद्य १ [ अस्सल-मोडी
१७९० ऑक्टोबर ता. २३

श्री धानाई[1]




आज्ञापत्र राजश्री कृष्णाजी थोरात तां मोकदमानी मौजे बहुरली प्रा कागल ता वालवे सुा इहिदे तिसैन मया व अलफ वेदमूर्ति राजश्री आबाभट बिन जीवभट उपनाम व्यास गोत्र विश्वामित्र सूत्र आश्वलायन वास्तव्य क्षेत्र नरसीपुर प्रा सिराळे कृष्णातीर हे थोर सत्पात्र जाणून कन्यस्थ ब्रहस्पती चंद्रपर्व या पर्वकाली मौजे मजकूरपैकी आवल प्रतीची चालीची सिवराई काटीमुले बिघे ८५ पांच हकदार खीरीज करून दरोबस्त इनाम करार करून दिल्ही आसे तरी सदरहु जमीन चतुःसीमा करून देऊन च (क) नामा लिहून देणे आणि यांस व पुत्रपौत्रादि वंशपरंपरा इनाम चालवणे प्रतिवर्षी नवीन पत्राचा आक्षेप न करणे या पत्राची प्रति लेहून घेऊन हे आसल पत्र भटजीजवळ भोगवटीयास परतून देणे शके १७१२ साधारण नाम संवछरे आश्विन वद्य १ छ १४ माहे सफर

१ अक्षर निराळें.

मोर्तब
सुद

बार

लेखांक १० ] १७१२ आश्विन वद्य १ [ अस्सल-मोडी
१७९० ऑक्टोबर ता. २३

श्री धानाई[1]

राजश्री मनोहर नागेश गोसावी यांसी

॥ अखंडितलक्ष्मीआलंकृत राजमान्य स्ने॥ कृष्णाजी थोरात दंडवत विनंति उपरी वेदमूर्ति राजश्री आबाभट बिन जिऊभट उपनाम व्यास गोत्र विश्वामित्र सूत्र आश्वलायन वास्तव्य क्षेत्र नरसिंहपुर प्रा शिराळे हे थोर ब्राह्मण सत्पात्र जाणून याचे योगक्षेमास मौजे बहुरली प्रा कागल येथे शिवराई काठी मुळे जमीन बिघे ५ पांच अवल प्रतींची देविली असे तरी तुम्ही मौजे मजकूरास जाऊन सदरहू जमिनीचा डाग चतुसीमा करून देऊन मोकदमाचा चकनामा करून देववणे जमिनीचा डाग बिनवारशी पाहून चतुसीमा करून देणें या

श्री धानाई च
रणि तत्पर सीवसुत
कृष्णाजी थ रा
त नीरंतर

पत्राची प्रती लेहून घेऊन हे पत्र भटजीजवळ भोगवटीयास परतून देणे सुा इहिदे तिसैन मया व अलफ छ १४ माहे सफर बहुत काय लिहिणें हे[1] विनंति

मोर्तब
सुद

बार

---

१ अक्षर निराळे.

लेखांक ११ ] १७१७ चैत्र शुद्ध २ [ नक्कल-मोडी
१७९५ मार्च ता. २२

श्री नरहरी

तालीक

श्रीमत् वेदशास्त्र संपन्न राजमान्य राजश्री रामचंद्र पंडित बाबा उपनाम देव गोत्र कृष्णत्री सूत्र कात्यायन जोतिषी मौजे निधोने व बावणे व पाडळी व कळवणे व नायेगांव प्राा अंतूर व मौजे एडगांव मौजे वईगांव व सोनारी बु॥ व सोनारी खु॥ व पोखरी प्रां फुलहारी वास्तव्य क्षेत्र नरसीपुर स्वामींचे सेवेसी विनंति सेवक संताजी बिन तुकोजी सावंत व मुकुंदजी सावंत पाटील व बाजी नरसिंव्ह व बापु भीमराव राघो जगजीवन व सखो शामजी पूजक व कुळकर्णी क्षेत्र मार प्रांत शिराळे व मौजे कोळे प्रां कऱ्हाड दंडवत व सां नमस्कार विज्ञापना ऐसीजे आपणास क्षेत्र मारी जागा बापु भीमराव याचे जागेचे उत्तरेस लांबी हात सुमार १७५ पावणे दोनशे रुंदी पूर्व पश्चम हात सुमार १०० शंभर व नारो बलाळ याचे उत्तरेस रुंदी दक्षणउत्तर हात सुमार ५० पनास लांबी पूर्वपश्चम हात सुमारे १५० दीडसे येणेप्रा वसले दोन चतुसीमापूर्वक करार करून आपणास जागा दिल्हा असे तरी स्वामींनी ग्रहदिक करून पुत्रपौत्रादि वंशपरंपरेनें अनभवावे हें लेहून दिल्हें पत्र सही तेरीख छ ३० माहे शाबान शके १७१७ राक्षसनाम संवत्सरे चैत्र शु॥ द्वितीया सुा खमस तीसैन मया व अलफ सेवेसी श्रुत होय हे विज्ञापना

निशाण नांगर बाा बाळाजी भीमराव कुळकर्णी
नांगर पूजक क्षेत्र मार व मौजे मार
( नांगराचें चित्र )

साक्ष

१ राघुजी बिन मुरारजी ढिसले पाटील क्षेत्र मार
१ नारो बलाळ पूजक कुळकर्णी क्षेत्र नरसींपुर व मौजे कोळे
१ गोविंदभट बिन्न श्रीपतभट जोशी क्षेत्र मजकुर
१ अनंतभट बिन कृष्णभट ज्योतिषी क्षेत्र मार

१ रंगभट बिन्न दादंभट ज्योतिषी क्षेत्र नरसिपुर
१ नारायणभट बिन्न जिउभट जोतिषी क्षेत्र नरसिंपुर
१ जनार्दनभट बिन्न कृष्णंभट घळसासी
१ रंगाचार्य बिन्न अनंताचार्य घळसासि
१ लक्ष्मणभट घळसासि
१ भिंमट घळसासि[1]



लेखांक १२ ] १७१८ पौष वद्य १ [ नक्कल-मोडी
१७९७ जानेवारी ता. १३

श्री नरहेरी[2]

तालीक

श्रीमत् वेदशास्त्रसंपन्न राजमान्य राजश्री रामचंद्र पंडितबाबा उपनांव देव गोत्र कृष्णत्री सूत्र कात्यायन जोतिषी मौजे निधोन व पाडली, कळवण व नायगांव पा। अंतूर व मौजे आडेगांव व वईगांव सोनारी बु॥ व सोनारी खुर्द व पोखकरी प्रांत फुलमरी हाली वस्ती क्षेत्र नरसीपुर प्रा। शिराळे स्वामींचे सेवेसी विद्यार्थी मोकदमानी क्षेत्र मा॥र प्रा। मा॥र दंडवत व सां। नमस्कार विज्ञापना ऐसीजे आपणास क्षेत्र मजकुरीं वाडा बांधावयासी जागा बापु भीमराव कुळकर्णी व पूजक क्षेत्र मजकूर याचे जागेचे उत्तरेस लांबी हात सुमार १७५ पावणे दोनशे व रुंदी पूर्वपश्चम हात सुमार १०० शंभर व नारो बलाळ कुळकर्णी व पूजक क्षेत्र मा॥र याचे जागेचे उत्तरेस रुंदी दक्षणउत्तर हात सुमार ५० पन्नास व लांबी पूर्वपश्चम हात सुमार १५० दीडशे

---

१ उजवीकडील सर्व साक्षी बाळबोधीत. २ अक्षर निराळे.

येणेंप्रों वसले दोन चतु:सीमापूर्वक करार करून आपणास जागा दिल्हे असे तरी स्वामीनी आनभऊन पुत्रपौत्रादि वंशपरंपरेने असावें हें लेऊन दिल्हें पत्र सही तेरीख छ १४ माहे रजब शके १७१८ नलनाम संवत्सरे पौष वद्य १ भृगुवार सुा सबा तीसैन मया व अलफ सेवेसी श्रुत होये हे विज्ञापना

बाा बापु भीमराव कुळकर्णी<br>व पूजक क्षेत्र माार व<br>मौजे कोळ प्रांत कराड

निशाण नांगर<br>( नांगराचें चित्र )

लेखांक १३ ] १७१९ श्रावण शुद्ध ५<br>१७९७ जुलै ता २८ [ अस्सल-मोडी

श्री

आज्ञापत्र राजमंडल ताा मोकदमानी मौजे घुणकी ताा वडगाव सुा सबा मया तेन व अलफ मौजे मजकुरी श्री चे सासराने काठीचे खर्चा बाा संताजी बिन तुकाजी पाटील यांसी जमीन बिघे ८१० दाहा पेशजी देविले आसतां सदरहु जमीन पाटील माार यासी देत नाही म्हणोन हुजूर निवेदन जाहाले तरी आज्ञेप्रों जमीन रांणोजी[1] मोरे याज बाा आहे ती याचे स्वाधीन करणे हेविषी फिरोन बोभाट येऊ न देणे जाणीजे राा छ[2] ३ माहे सफर मो सूद[3]




१ याची नकल आहे, त्यांत " रावजी " नांव आहे.

२ त्या नकलेंत १३ आहे. नकलेच्या शेवटीं " आसल बरहुकुम नकल असे " असा जास्त मजकूर आहे.

३ निराळे अक्षर.

लेखांक १४ ] १७१९ कार्तिक शुद्ध ४ [ अस्सल-मोडी
१७९७ ऑक्टोबर ता. २३

श्री



आज्ञापत्र राजश्री रघुनाथ रामचंद्र पंडितराव ता। संताजी पाटील सांवत क्षेत्र मौजे नरसींपुर प्रां। शिराळे सु॥ सबा मया तेन व अलफ तूं येऊन विनंति केली जे मौजे मजकुरी गांवठाणानजीक तुमची जमीन आहे तिची हद काब्रासाच्या वाड्याचे उत्तरेस नारोबा पुजारे कुळकर्णी याचे हदे पावेतो आहे ती जागा आम्हास नांदणूकेस द्यावी म्हणून तूं येऊन विनंति केली त्याज वरून तूं आमच्या पदरचा जाणून तुजला व वे॥ राजश्री गोविंदभट आरे जोशी तुम्हा उभयतास ती जागा घरें बांधावयासी दिल्ही असे तुम्ही उभयतां घरें बांधोन वंशपरंपरेनें सुखरूप राहणें जाणीजे छ २ जमा दिलावल

लेखना
वधी

---

लेखांक १५ ] १७२० कार्तिक शुद्ध ६ [ अस्सल-मोडी
१७९८ नवंबर ता. १३

श्री

अखंडित लक्ष्मी आलंकृत राजमान्य राजश्री
गंगाधर धोंडदेव गो

यांसी सेवक परशराम श्रीनिवास प्रतिनिधी नमस्कार सु॥ तीसा तिसैन मयां व अलफ मौजे कोळे प्रा॥ कराड येथील पाटीलकीविसीं चवाण

गडदरे यानी गैरवाका समजाऊन पत्र नेले ते पत्र दप्तरांत बार केले असेल म्हणोन शोध केला तो बार केलें नाहीं त्यास त्या पत्रावरून तुम्ही सावंत पाटलास बहुत उपद्रव केला म्हणोन रा। सखो शांमजी दि। राजश्री मंत्री यानी विदित केलें त्याजवरून हे पत्र तुम्हास सादर केले असे तरी चत्राण गडदरे यास पेशजीचे पत्राची नकल देऊन खुणेस मोर्तब करून हुजूर पाठवणे आणि सावंत यांस गडदरेविसीं हरयेक उपद्रव न करणे फिरून बोभाट येऊ न देणे जाणिजे छ ४ जमादिलाखर निदेश समक्ष

सुरु सुद बार






लेखांक १६ ] १७२८ फाल्गुन वद्य ३० १८०७ एप्रिल ता. ७ [ अस्सल-मोडी

श्री

आज्ञापत्र राजमंडळ ता। मोकदमानी मौजे घुणकी तो। वडगांव सु॥ सबा मया तेन व अलफ मौजे मा।री राणोजी मोरे याजकडे जमीन सनदेची होती ती दूर करून सदरहु जमीन ८१० दहा बिघे संताजी बिन तुकोजी पाटील मौजे नरसिंगपुर ता। सिराळे याजवरी स्वामी कृपाळू होऊन श्री चे उछाहास वैशाखमासी साल दरसाल सासनकाठी आणणे बा। देविली असे तरी आज्ञेप्रमाणें जमीन दहा बिघे पाटील मा।र याजकडे जमान देऊन चालवीत जाणे जाणीजे रा। छ २८ माहे मोहरम मोर्तब सूर्द[1]




बार



(१) निराळे अक्षर.

लेखांक १७ ] १७४५ वैशाख वद्य ८ [ अस्सल-मोडी
१८२३ जून ता. २

श्रीरामचंद्र

१
३
बंद तीन रास

लिखित
मिदं

यादी श्री च्या उछाह करवीर मुकामी होत आहे त्या उछाहांत क्षेत्र नरसिंगपुर येथून सासनकाठी यावयाची त्याचा मान संताजी पाटील सावंत मौजे कोळे व क्षेत्र मजकूर यास करून देऊन त्याचे खर्चाबद्दल मौजे घुणकी तो वडगांव येथें छत्रपति यांजकडून जमीन बिघे दाहा करून दिल्ही ती जमीन पाटील मजकूर यानी अनभऊन सासनकाठी आणीत गेले त्या उपरी पाटील मजकूर यानी उभयेता पुत्र गोंडोजी व नाथाजी पाटील यासी सांगितले जे हा मान मेळविला आहे हा तुमचा उभयेताचा येथाविभाग जमीन अनभऊन सासनकाठी चालवावी यैसे असतां उभयतांत खटक पडून श्री यांजकडे येऊन आपला मजकूर सांगोन बोलले जे आपण धनी आहां आज्ञा होईल त्याप्रमाणें उछाहास सासनकाठी आणोन आज्ञेप्रमाणें उभयेता वर्तणूक करूं याप्रमाणें विनंति केली त्याजवरून उभयेता ठराव करून दिल्हा बी तपशील

१ काठीचा मान संताजी पाटील यानी मेळविला व उभयता व उभयेता पुत्राकडून काठी नेहवीत गेले व पुढे हि उभयेताकडे काठी नेहणेचे चालवावे म्हणोन सांगितले त्याजवरून ठराव केला जे काठी व पादुका वडील गोंडी पाटील याचे घरीं असाव्या करवीरास काठी आणते समई काठीवर पादुका नाथाजी

पाटील याने ठेवाव्या व काठी गोडी पाटील याच्या घरांतून निघाली म्हणजे नाथाजी पाटील याचे घरीं आणून पुजा करून लागलीच श्रीच्या वाड्यांत आणावी तेथें पुजा होऊन नंतर करवीराकडे यावयासी चालती व्हावी करवीरीं दररोज छेबिन्यास काठी निघावयाची त्यासमई काठीवर पादुका नाथाजी पाटील यानें ठेवीत जाव्या व उतरून ठेवीत जाव्या काठी माघारे नरसिंगपुरास गेल्यावर अगोदर श्रीच्या वाड्यांत जाऊन पुजा होऊन नंतर नाथाजी पाटील याचे घरीं जाऊन पुजा होऊन नंतर गोडी पाटील याचे घरीं आणून पुजा करून काठीवरून पादुका उतरून नाथाजी पाटील यानें गोडी पाटील याचे घरीं ठेवाव्या येक साल काठी गोडी पाटील यानी व येक साल नाथाजी पाटील यानी करवीरास आणीत जावी जमिनीचा वसूल ज्या सालीं जो काठी आणील त्यानी त्या सालचा वसूल घेत जावा नफा तोटा जमिनीचा ज्या सालीं होईल तो ज्याच्या सालांत होईल त्यानें सोसावा येकामेकास बोलावयासी समंध नाहीं व करवीर मुकामीचे पागोटें बांधावयाचे वगैरे मान ज्या सालीं जो काठी आणील त्यानें घ्यावे कलम

१ साल मारीं ठराव करून दिल्हा आहे त्याप्रमाणें पुढें वागावें यामागें जाबसाल समाईक होता सबब मागील तोटानफा जो जाहाला असेल तो ज्याचा त्यानें सोसावा कोणी कोणास विच्यारु नये कलम

१ पुढें वंशपरंपरा गोडी पाटील व नाथाजी पाटील याचे पुत्रपौत्रादि वडील पुत्र यानीं जमिनीचा उपभोग व मानपान व काठी पादुका ठेवणे व आणणें नेहणे वगैरे सदरीं कलमें लिहिलीं आहेत त्याप्रमाणें करीत जावे उभयेताचे घराण्यांत जे कोणी बीरादार

भाऊ होतील त्यास सदरहु काठी व पादुका व जमिनीविसी वगैरे अर्थाअर्थी समंध नाहीं कलम

येकूण कलमें तीन सदरी लिहिलीं आहेत त्याप्रमाणें उभयेतानी परस्परें येकविच्यारें वागून सरकारचाकरीस हाजीर असावे सुा सलास आश्रीन मया तैन व अलफ शके १७४५ सुभानुनाम संवत्सरे वैशाख मास छ २२ रमजान मो सुद

१



सदरहु गोडजी बिन संताजी सावंत पाा पत्राप्रमान मान्य असो
सदरहु नाथाजी बीन संताजी पाटी सावंत पत्राप्रमाणें माम्य आसो

बार



लेखांक १८ ] १७५५ चैत्र वद्य ४ / १८३३ एप्रिल ता. ८ [ नकल-मोडी

श्री

तालीक

राजेश्री कृष्णपा पोवार व
मौजे घुनकी गोसावी यांसी

कोवलनामा बाा नाथाजी पाटील नरसिंगपुर सुा सलास सलासीन मया तेन व अलफ लिा दिल्हा कोवल ऐसीजे आमची श्री चे काठी

( १ ) याप्रमाणे च जोडांवर मागील बाजूस दोन शिक्के आहेत.

( २ ) गोडजी पाटील यांचा स्वदस्तुरचा शेरा मोडींत.

( ३ ) नाथाजी पाटील यांचा स्वदस्तुरचा शेरा बाळबोधींत.

बा। सनद बिघे ८११० दाहा मौजे मजकुरी डागकडील नजीक आहे ती जमीन आम्ही तुम्हास खंड मगता पनाली रुो ३८ आडतीसीस करार करून दिल्हे असे यासी बोली साल सुमार ७ सात साल कर्णे यासी पटी व पलांगी विसी व हरयेकविसी उपद्रव लागू देणार नाही तुम्ही शेत करून राखण आणि रुपये सहापबंदी बी

तपशील

| | |
|---|---|
| १४ जोरीवर | १२ हरभरवर |
| १२ कापसीवर | |
| २६ | १२ |

३८

येणेप्रो देऊन सुखरूप करणे हे लिा दिल्हा कोवल सई तरीख छ १७ माहे जिल्काद ऊर्फ चेइत्रमास शके १७५५

निशाण नांगर

साक्ष

१ बलवंतराव देसाई निा श्री मौजे मार

१ पिराजी पा मौजे तांदुलवाडी

कलम विश्वनाथ गंगाधर कुळकर्णी मौजे मार

---

लेखांक १९ ] १७८६ पौष शुद्ध १३ १८६५ जानेवारी ता. ९ [ नक्कल-मोडी

श्री नरहरी

तालीक

वेदशास्त्रसंपन्न राजमान्य राजेश्री रामचंद्र पंडित उपनाम देव गोत्र कृष्णेत्री सूत्र कात्यायेन जोतिषी मौजे निघोन पा अंतूर वास्तव्ये

क्षेत्र नरसीपुर स्वामींचे सेवेसी विनंति सेवक संताजी बिन तुकोजी सावंत पा। व मुकुंदजी सावंत पा। व बाजी नरसिंह व बापुजी भीमराव व राघो जगजीवन व सखो शामजी कुळकर्णी व पूजक क्षेत्र मा।र प्रां। शिराळे व मौजे कोळे प्रांत कराड दंडवत सा। नमस्कार विज्ञापना ऐसीजे आपणास क्षेत्र मा।री नांदावयास जागा बापु भीमराव व नारो बलाळ कुळकर्णी पूजक याचे जागेचे उत्तरेस रुंद हात सुमार १०० शंभर लांबी पूर्वपश्चेम हात सुमार २५० अडीचशे येणप्रो। चतुःसीमापूर्वक करार करून दिल्ही आहे तरी स्वामींनीं वाडा बांधून वौपपरंपरेनें आनभवावे हें लेहून दिल्हे पत्र सही तेरीख छ १० माहे शाबाल शके १७१५*

सु।। खमस सीतैन मया तैन व अलफ सेवेसी श्रुत होय हे विज्ञापना

नि।। नांगर

( नांगराचे चित्र )

साक्ष

बा।। बापजी भीमराव कुळकर्णी व पूजक क्षेत्र मा।र व मौजे मा।र

क्षेत्र मा।र

१ नारो बलाळ पूजक कुळकर्णी
१ बनेभट बिन मनभट जोसी
१ गोविंदभट बिन श्रीपतभट जोशी
१ अनंतभट बिन कृष्णभट जोशी
१ गोविंदभट बिन दादभट जोशी
१ आबा व्यास बिन बाबु व्यास

१ भास्कर गोविंद कुळकर्णी मौजे रेटरे हरणाक्ष
१ सर्ज्याराव बाबुराव कुळकर्णी का।। अष्टे प्रा।। मिरज
१ काशी रघुनाथ कुळकर्णी मौजे कापुसखेड

---

* (?)

लेखांक २० ] [ नक्कल-मोडी

श्री

तालीक

यादी महजरावरील साक्षी बी तपशील

शिक्का श्रीमंत शाहु छत्रपति

शिक्का श्रीमंत पंत प्रतिनिधी

देशक प्रांत शिराळे

देशमुख देशपांडे

महाजन नाईकवाडी

गावगना भोरगांव

मौजे सुरळी, मौजे बाबवडे बु॥, मौजे वाटेगांव, मौजे रेटरे ( जु ) जारात, मौजे तांबवे, मौजे बारगांव, मौजे कापुसखेड, मौजे बाहे ता॥ वाळवे, मौजे नेरले प्रात कराड, मौजे सिरटे प्रांत कराड, मौजे रेटरे बु॥, मौजे सलबी, मौजे गेदी, मौजे शेणोली, मौजे बिसूद

—<>ஞ<>—

( टीप—पान ६४ वरून लेखांक २० पुरा झाला असें दिसतें. पण तसें नसून या पानावर तो च लेखांक चालू आहे. )

मौजे नरसीपुर प्रांत शिराळे नांवनिशी

३ कुळकर्णी

१ कृष्णाजी अनंत

१ शामजी नरसिंव्ह

१ भगवंत जिवाजी

३ जोशी

१ बाबदेवभट बिन्न नरसीभट

१ व्यंकटभट बिन्न चंद्रभट

१ पांडुरंगभट बिन्न व्यंकणभट

३

५ बलोत

१ सुभानजी बिन्न जिवाजी परीट

१ हणगोजी न्हावी

१ शिवनाक मांग

१ करोजी चांभार

१ केदारनाक महेत्र महार

५

येणेप्रमाणे भोवरगाव पाटील कुळकर्णी नांवनिशी नांगर व बी कलम सुधा व पांढरींतील नांवनिशी सदरहु प्रमाणे असे



लेखांक २१ ] [ अस्सल - मोडी

श्री

चिरंजीव राजश्री बाळाजीपंत आण्णा यांसी गणेश काशी आशिर्वाद उपरी मौजे कोळे प्रा। कराड येथील पाटीलकी सावंताची त्यास पेशजी चवाण गडदरे यानी पाटीलकीविसी गैरवाका समजाऊन किले मचिंद्रगडास पत्र नेलें त्यानी सावंत यास उपद्रव केला त्यास सावंत यास

उपद्रव करूं नये चवाण गडदरे यास येथें पाठऊन देणें म्हणून सरकारचें पत्र गेलें च आहे हाली चवाण गडदरे तुम्हास गैरवाका समजाऊन किल्यास पत्र घेणार म्हणोन कळलें त्यावरून तुम्हांस पत्र लिहिलें आहे तर चवाण याचे सांगीवर तुम्ही येकंदर पत्र देऊ नये जो ज्या वेळेस येतो तो हरकोणाची भीड घालून पत्र नेतो याकरितां तुम्हापासी कोणी येईल त्यास पत्र देणे ते तेथील अधिकारी असेल त्यास वाजबी हरदोजणाचा वाका समजोन उत्तर पाठवणे मनास आणून मग सरकारचीं पत्रें सादर होत जातील त्याप्रमाणें वर्तवणे असें लिहीत जाणे हाली हरदोजणाचा मजकूर लिहिला आहे याची चौकशी उभयता आणून करावी वाजबी दिसेल त्याप्रों ताकीद करून उभयतास वर्तवणे मारपात उभयता करू नये रा छ २५ रमजान बहुत काये लिहिणे हे आशिर्वाद



लेखांक २२ ] [ अस्सल-मोडी

यादी नरसीपुरचे पाटीलचे वतन समंधें संताजी बिन लखमोजी सावंत पा मौजे मजकूर पत्रें बी तपशील

१ संतोषपत्र तुळजाई पाटीलीणीचे
१ देशक व गोतानी महजर करून दिल्हा
१ राजपत्र देशकास
१ महजर राजमुद्रेचा
२ उदाजी चव्हाण हिमत बहादुर यांचीं पत्रें
—
६

१ महजराची नकल पत्र
—
७



लेखांक २३ ] [ अस्सल-मोडी

श्रीरामचंद्र

चिरंजीव राजश्री संताजी पाटील क्षेत्र नरसीपुर यांसी आसीरवाद उपरी तुम्ही पत्र पाठविलें तें पावलें लिहिला मजकूर कळला मौजे घुणकीचे काठीचे शेताविषीचे ताकीदीविषी लिहीले त्यास सरकारांत ठरलें आहे कीं सनद पाहून चिठी देविली जाईल त्याजवरून लिहीलें आहे तरी सनद लवकर पाठऊन देणे म्हणजे बोलाऊन चिठी घेऊन स आज्ञा केली जाईल रा छ १५ मोहरम हे[1] आसीवाद



लेखांक २४ ] [ नकल-मोडी

श्री

असलबरहुकुम नकल

आज्ञापत्र राजमंडल ता मोकदमानी मौजे घुणकी तो वडगांव सुा सबा मया तेन व अलफ मौजे मारी राणोजी मोरे याजकडे जमीन सनदेची होती ती दूर करून सदरहु जमीन ८१० दाहा बिघे संताजी बिन तुकोजी पाा मौजे नरसीपुर ताा शिराळे याजवरी स्वामी कृपाळु होऊन श्रीचे उछाहास वैशाख मासी साल दरसाल सासनकाठी अणेबा। देविली असे तरी आज्ञेप्रमाणें जमीन दाहा बिघे पाटील मार याजकडे जमान देऊन चालवीत जाणे जाणीजे रा छ २८ माहे मोहेरम मों सूद शिका



लेखांक २५ ] [ अस्सल-मोडी

श्री

राजश्री नाथाजी पाा क्षेत्र नरसीपुर गोसावी यासी

स्ने कृष्णपा पोवार मु॥ घुनकी रामराम विनंति विशेप तुम्हा काठीचे

---

1 अक्षर निराळें

खेतचे हो पा देणे म्हणोन लि॥ त्यास माणिकतराळ याचे दारी सिपाई बैसविला तो चिठी धरीत नाही व जेव हि देत नाही त्यास आपण आले मंतर कोणची ती तोड निघेल आपण आले पाहिजे बहुत काये लि॥ लोभ करावा हे विनंती



लेखांक २६ ] [ अस्सल-मोडी

श्री

श्रीयासह चिरंजीव राजश्री बाळाजी पंत याप्रति विठल सुरो आशीर्वाद उपरी येथील कुषल जाणऊन स्वकीये लेखन करीत असिले पाहिजे विशेष संताजी पाटील मौजे कोळे पा कऱ्हाड याची पाटीलकी मौजे नरसीपुरची आहे त्यास नामाजी सावंत हुजूर याकडे आहे त्याचे साखतीनें संताजी पाटील यासी पाटीलकीचा कजिया करितो याबदल संताजी पाटील हुजूर आला आहे सकल वर्तमान तुम्हास सांगेल त्यावरून राजश्री रायापासी यास उभा करून रास्ती इनसाफ होय तो अर्थ करणे आपणाकडून सर्वविसी याची मदत करून स्थापना होय तो अर्थ करणे बहुत काये लिहिणे लोभ असो दिजे हा आशीर्वाद हा आशीर्वाद संताजी पाटील आमचे वोडीचा आहे त्यावर लोभ करीत जाणे हा आशीर्वाद



लेखांक २७ ] [ नकल - मोडी

श्री

तालिक

राजश्रीया विराजित राजमान्य राजश्री बापुजीपंत स्वामी गोसावी यांसी सेवक शिवाजी रुद्र सां नमस्कार विनंति येथील क्षेम जाणून

स्वकीय कुशल लेखन करणे यानंतर कोळेकर संताजी पाटील यानें नवी पाटीलकी नरसीपुरची घेतली आहे म्हणऊन स्वामीयासी सांगणारानी सांगितलें याकरितां त्यास करून प्यादे पाठविले त्यावरून संताजी पाटील परांगदा जाह्ला आहे याची हकिकत तरी, येतगांव कोळे नरसीपुर व बिचूत येथील पाटीलकी सावंताची चौगांवीं चौघे भाऊ राहिले आहेत त्यास नरसीपुर विठोजी पाटील संताजीचा चुलत चुलता कारभार करीत होता तो मेला त्याची बाईको तुळजाई तीस पोटीं मूल नाहीं तिचें संरक्षण संताजीनें केलें त्यास तीस वर्षे जाह्लीं तुळजाईनें संताजीचा लेक म्हणजे तिचा नातु तो राजेश्री जत्यजी देसाई व तीर्थस्वरूप राजेश्री पंत कैलासवासी याच्या विदमाने आपले वोटीस घेतला या उभयतानीं तिच्या वोटा मूल घातला त्यावरी ते बाईकोस व मुलास संकराजी देसाई व मिराजी देसाई व गोविंदराम याकडे पाठविले त्यानी बाहे गांवीचे पाटील मेळऊन त्यानीं मूल ते बाईकोच्या वोटा घातला आहे संताजी पाटील व विठोजी पाटील याचे घर येक येकाचें घर बुडाले तरी हें च जण खाईल दुसऱ्यास फिटत नाहीं त्या ही बाइकोने गोताच्या विदमाने घेतला आहे माहर नांगर होळीची पोळी याची आई बाइकोने मूल घेऊन कारभार करीत होती त्यास वर्षे बाइको मेली आणि असोन येडेकरानी नरसीपुरासी घसघस लाविली आहे यास तुम्हा लोकापासी उभे राहावे तरी खावयास नाहीं असा प्रसंग वतन तो सावंताचे पूर्वापार आहे संताजीनें नवीन कोणाचें घेतलें नाहीं येडेकरास आणून याचे वाटे नव जायेत यैसे करणे आमच्या वडीलानी केला आसेल तो अन्यथा होऊ पाहेल हे होणार नाहीं याचा वृत्तांत तुम्हांस विदित म्हणून लिहिले आसे या करितां आपण येत होतो सातारियास जाणे जरूर लागले याकरितां गेलो तुमचा आमचा द्वैत प्रसंग नाहीं म्हणून पाटील आम्हापासी आला होतो स्वामीपासी पाठविला आहे वतनास आन्यथा करावी ऐसे नाहीं याविसी राजश्री गोविंद बळवंतराव सांगतील ते चित्तांत आणून यास कागदपत्र करून देऊन यास कोणी कज्या न करी अैसे

कीजे अगर आपण सातारियाहून येईतोवरी तहकूब करून गांवावर राहे ऐसे करणें आपण आलियावरी स्वामीस वर्तमान निवेदन करून याची

देउन याविसी आम्ही बेफीकीर स्वामीकरितां आहो विशेष काय लिहिणे कृपा असो दिजे हे विनंति

बार



# श्रीरामदासींचीं ऐतिहासिक कागदपत्रें

# ( २ )

## नरसीपुर - सावंत

### व्यक्तींची व स्थळांची सूची

( अंक पृष्ठांचे आहेत )

## ख



## ग

## न



## प



## फ



## ब